# संगीत विक्रमोर्वशीय नाटक.



गोविंद बल्लाळ देवल,

दुर्गा व संगीत मृच्छकटिक या नाटकांचे कर्ते,

यांनीं रचिलें.





एप्रिल, सन १८८९.

किंमत १२ आणे.

श्रीमन्महाराज शिवाजीराव

होळकर

यांचे सेवेशीं

ग्रंथकर्त्यानें

हें नाटक परमादरपूर्वक

अर्पण केलें असे.

---

# प्रस्तावना.



विक्रमोर्वशीय हें नाटक अभिज्ञान शाकुंतलाचेंच भावंड असल्यामुळें त्याच्या मनोरम गुणांची प्रशंसा करण्याची अवश्यकता नाहीं. शाकुंतल हें वयानें कनिष्ट, परंतु गुणांनीं श्रेष्ट; आणि विक्रमोर्वशीय हें वयानें जेष्ट, परंतु गुणांनीं कनिष्ट, असें बऱ्याच पंडितांचें मत आहे; व या दोन्ही नाटकांचें मार्मिकपणानें परीक्षण केलें असतां, हें मत यथार्थ असल्याचें समजून येईल. विक्रमोर्वशीयास कोणी नाटक न ह्मणतां, त्रोटक ह्मणतात. परंतु " प्रत्यंकं सविदूषकम् " या लक्षणा प्रमाणें यांत प्रत्येक अंकांत विदूषक नाहीं; ह्मणून नाटक ह्मणणेंच योग्य होय. शाकुंतलाप्रमाणेंच या नाटकाचें कथानक सुरस आहे. आतां मूळ नाटकांतील रस भाषांतरांत जसाचा तसाच उतरणें कठीण, परंतु मी तसें करण्याविषयीं बराच यत्न केला आहे. तो कितपत सफल झाला याचा निर्णय करणें मी प्रिय वाचकांकडे अथवा प्रेक्षकांकडे सोंपवितों.

भाषांतराकरितां रा० ब० शंकर पांडुरंग पंडित यांची छापील प्रत मूळाधार धरिली आहे. तथापि त्याच प्रतींतील प्रत्येक पृष्टाखालीं जे भिन्न भिन्न पाठ दिले आहेत, ते सर्व परस्परांशीं ताडून त्यांतील उत्तम उत्तम वाटले, तेच भाषांतरासाठीं निवडून घेतले आहेत. भाषांतर करितांना ज्या

शंका आल्या त्यांतील कांहीं डा० भांडारकर यांनीं दूर के
ल्या याबद्दल मी त्यांचा फार आभारी आहें. तसेंच ज्यांनीं
ज्यांनीं या कामीं मला सहाय्य केलें त्यांचेही अभार मानितों.

श्रीमन्महाराज शिवाजीराव होळकर यांचे सेवेशीं हें नाटक त्यांच्याच आज्ञेवरून समर्पण केलें आहे. त्यांस चिरायु करून प्रजापालनाचें कठिण काम यथान्याय व-डावें असें त्यांस बुद्धिबल दे, व वडिलाप्रमाणें त्यांसही की-र्तिमान कर अशी जगदीशाची प्रार्थना करून, ही लहानशी प्रस्तावना संपवितों.

गो. ब. दे.

# शुद्धिपत्र.

| पान. | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| ३ | ११ | दप | पद |
| ४ | २१ | चक्रवेगें | चक्रवेगें |
| ६ | १५ | चाळ | चाल |
| १२ | १३ | सखींच व | सखींच |
| १३ | ७ | माल | माळ |
| १९ | १५ | करितास | करितोस |
| २२ | १९ | नर्तमां | मनांत |
| २४ | २४ | सखे | खरच |
| २९ | १८ | सखीसह | सखीसंगें |
| ३० | १६ | याग्य | योग्य |
| ३३ | १ | पाहं | पाहूं |
| ३३ | २ | नाहा | नाहीं |
| ३३ | १५ | वायना | वाऱ्यान |
| ३३ | १८ | वाटत | वाटतं. |
| ३३ | २२ | कौटळ | कौटाळ |
| ३६ | ११ | आर्जवाल | आर्जविलें |
| ५१ | २० | विद | विदू |
| ५२ | ९ | करी | करी गे |
| ६८ | २४ | मनीं | मनीं |
| ६९ | ३ | लाटिले | लोटिलें |
| ६९ | १४ | कानन लक्ष्मी | काननलक्ष्मी |

| पान. | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| ७१ | १९ | श्रवणि | श्रवणिं |
| ७३ | १९ | राहीलि | राहिलि |
| ७४ | १३ | माहाराजांच्या | महाराजांच्या |
| ८३ | २३ | तरी | तरि |

# संगीत विक्रमोर्वशीय.

## अंक १ ला.

### मंगलाचरण.

पद.

( कवि वंदुनि आदी० या चा० )

हें वंदन त्या श्रीशुभदाया ॥ गुरुबलवंताच्या मग पायां ॥ धृ० ॥ जननी जी कां आनंदाची ॥ धवल चंद्रिका हृत्कमलाची ॥ दिव्य दीपिका अज्ञानाची ॥ कामदुहा जी रसिका साची ॥ वाग्देवी ती कविराजाची ॥ स्तवितों मानसमल जाया ॥ १ ॥

पद.

( पूर्वी अधरोष्टावरि० या चा० )

शंकर तो सुखदायक होवो ॥ तुम्हां सकलां रसिकांतें ॥ स्थिर भक्तीनें वश जो होतो ॥ अल्पायासें मनुजांतें ॥ धृ० ॥ एक पुरुष जो वेदांतीचा ॥ व्यापुनि उरला जगतातें ॥ ईश्वर शद्वा सार्थकता ही ॥ ज्याच्या ठायिंच कीं येते ॥ १ ॥ मोक्षपदाचा लाभ घडावा ॥ इच्छा ज्यांना ही

होते ॥ नियम करोनी प्राणादींचा ॥ शो-
धिति अंतरिं ते ज्याते ॥ २ ॥

सूत्रधार—असो, ( पडद्याकडे पाहून ) मारिषा, इकडे ये.

मारिष—( येऊन ) हा आलों. काय आज्ञा आहे ?

सूत्र०—मारिषा—

साकी.

पूर्व कवींच्या नाट्यरसाचे ज्ञाते जन हे बसले ॥
सुरस विक्रमोर्वशीय नाटक कवित्रयें जें रचिलें ॥
नूतन तें नामी ॥ प्रयोग त्याचा करितों मी ॥ १ ॥

तर सर्व पात्रांना आपापले पाठ तयार ठेवा ह्मणून सांग.

मारिष—आज्ञेप्रमाण करतों. ( जातो. )

सूत्र०—( सभेकडे पाहून ) आतां सर्व पंडितांना माझी अशी प्रार्थना आहे कीं:—

दिंडी

अम्हां दासांवरि लोभ म्हणुनि, किंवा ॥
वस्तु–पुरुषाचा मान बहु करावा ॥
लक्ष यास्तव लावोनि मार्मिकांनीं ॥
कविकृति ही परिसावि नवी कांनीं ॥ १ ॥

( पडद्यांत. )

अंजनी गीत.

सुर पक्षाचा असेल कोणी ॥
अथवा ज्याची गति या गगनीं ॥
या हो या लवकरि धांवोनी ॥
आम्हां रक्षाया ॥ १ ॥

सूत्र०—( ऐकून ) हा अति दीन स्वर कुणाचा वर ऐकायला येतो. ( विचार करून ) हां, समजलों.

साकी.

नरसख मुनिच्या ऊरूपासुनि झाली जी सुरवनिता ॥
हरिलें तिज असुरांनीं मार्गी कुबेर सेवुनि येतां ॥
यास्तव सुरयुवती ॥ वाटे शोक असा करिती ॥ १ ॥

( सूत्रधार जातो. )

( या प्रस्तावनेनंतर पूर्वोक्त ह्मणत अप्सरा येतात. इतक्यांत रथस्थ राजा व त्याचा सारथी असे प्रवेश करितात. )

राजा—शोक करूं नका—

दप ( शृंगा ताडोनी० )

सुंदरिनो आतां ॥ सोडा ॥ सर्वहि भय चिंता ॥सोडा॥धृ॥
सन्निध या माझ्या ॥ सांगा ॥कोण तुम्हां छळिता॥सांगा॥
भूप पुरूरव जाणा याते ॥ आलों येथें पूजुनि सविता ॥ १ ॥

रंभा—महाराज तो दुष्ट राक्षस.

राजा—काय राक्षस ! त्यान तुमचा कोणता अपराध केला सांगा ?

मेनका—ऐकाव महाराज—

पद ( वीरा भ्रमरा० या चा० )

उग्र तपा भंगाया इंद्रा अस्त्र चि जी सुंदरी ॥
स्वरूपें श्रीगौरीला हरी ॥ १ ॥
सुरलोकाचें भूषण साचें अमुची प्रिय उर्वशी ॥
सखी ही दुसरी तिजसह अशी ॥ २ ॥
कुबेर सदना जाउनि येतां मार्गी सखिच्या सवें ॥
हरिलें तिजला कुणि दानवें ॥ ३ ॥

राजा—वर तो दुष्ट कोणत्या दिशेन गेला ?

अप्सरा—महाराज, असा इशान्य दिशेन गेला.

राजा—ठीक आहे. तुह्मीं शोक करूं नका. मी तुमच्या प्रियस-
खीला आतां सोडवून आणतों.

मेनका—( हर्षानें ) चंद्राचे पौत्र आपण ! आपल्याला असच
करण योग्य आहे.

राजा—वर तुह्मीं माझी वाट पहात कुठें वसाल ?

सहजन्या—आह्मी सर्वजणी त्या हेमकूट पर्वताच्या शिखराव
आपली वाट पहात वसतों.

राजा—ठीक आहे. ( सुताकडे वळून ) सूता, इशान्य दिशेकडे
रथ चालीव.

सूत—जो हुकूम महाराज. ( घोडे हांकतो. )

राजा—( रथवेग पाहून ) शाबास सारथे शाबास ! या अशा
रथवेगान—

पद ( झडकरी पाव० )

टाकिन गरुडास हि मागें ॥ काय कथा
मग त्या असुराची, व्यर्थचि तो भागे ॥
॥ धृ० ॥हे घन चूर्ण पहा होती ॥ बारिक
रेणुंपरी दिसती ॥ रथाच्या मागे ते उ-
डतीं ॥ अरांत दुसरी पंक्ति अरांची दि-
सत चक्रवेगें ॥ १ ॥ हयशिरिं चामर
सरळ कसें ॥ चित्रासम तें अचल दिसे ॥
ध्वजपट हा ही स्थिर भासे ॥अंनीं दंडाग्रीं
सम ऐसा वेग पवनयोगें ॥ २ ॥

( असें बोलून राजा व सूत जातात. )

रंभा–गडे, राजर्षि तर गेला. चला आतां आपण देखील त्या हेमकूटपर्वतावर जाऊन वसूं.

मेनका–चला तर. ( पर्वतावर जातात. )

सहजन्या–सखे, तो राजर्षि आपल्या दुःखाचं निवारण करील कां ग ?

रंभा–अग, त्याची तुला अगदीं काळजी नको.

सहजन्या–सखे, दैत्यांना जिंकायच मोठं कठिण! ह्मणून ह्मणतें.

रंभा–गडे, इंद्र सुद्धां मोठमोठ्या युद्धाच्यावेळीं त्याला मध्यलोकांहून मोठ्या सन्मानान बोलावून आणून आपल्या सेनेच्या अग्रभागीं उभा करतो. कारण तो असला ह्मणजे देवांचा जय व्हायचाच आपला.

सहजन्या–बर बाई ! एकदां विजयी होवो ह्मणजे झाल.

मेनका. ( आनंदानें ) भगवाई !

दुंबरी.

झळके हरिणध्वज ज्यावरचा ॥ सोमदत्त
हा रथ भूपाचा ॥ धृ० ॥ होउनि विजयी
आला वाटे ॥ त्याविण नच तो परता-
याचा ॥ १ ॥

(सर्वजणी पहात उभ्याराहतात.)

( तदनंतर राजा, सूत, भ्यालेली उर्वशी व चित्रलेखा येतात. )

चित्रलेखा–सखे सावध हो. अस काय करतेस ती ?

राजा–सुंदरि सावधहो.

पद ( लाज येई रजनीस० )

लेश ही न उरला आतां दानवी भयाचा ॥
जाण सर्व महिमा हा त्या वज्रधारकाचा ॥ धृ० ॥
उघडि नेत्र कमलाक्षी हे सोड सोड भीती ॥
पंकजासि उघडी जैसी रविविकासिनी ती ॥
होय उषःकालीं जेव्हां लोप तो तमाचा ॥ १ ॥

चित्रलेखा–ही कांहीं अजून सावध होत नाहीं. नुसता श्वासोच्छ्वास मात्र चालला आहे. एवढ्या वरूनच ही जिवंत आहे अस ओळखायच.

राजा–चित्रलेखे,

पद ( मी कुमार ती हि० )

क्षिति झाली पीडित बघ ही ॥ तव सखी
असुरतापानें ॥ धृ० ॥ अति कोमल कु-
सुमासम हें ॥ कांपतें हृदय भीतीनें ॥
॥ चाल ॥ घनकुचांमधें जो दिसतो ॥
मंदारहार सुचवी तो ॥ हृत्कंप किती हा
होतो ॥ वर खालीं श्वासोच्छ्वसनें ॥ १ ॥

चित्रलेखा–सखे, तूं आपल्या मनाला कांहीं तरी धीर दे. अप्सरा असून असकाय करतेस ती! हें कांहीं वाई चांगल नव्हे. ( उर्वशी सावध होऊं लागते. )

राजा–( आनंदानें ) चित्रलेखे.

ठुंबरी ( बघुनि वाटते मन्मनीं० )

मजसि जाहली वाटतें॥सावध ही ॥धृ०॥
हळ हळु शशि उदयाचलिं येतां॥शोभितसे

तम रात्रीतें ॥ १ ॥ जातां धूर जशी र-
जनीची ॥ वन्हिज्वाला ती दिसते ॥ २ ॥
तट्पातानें कलुषित गंगा ॥ निर्मल जैशी
मग होते ॥ ३ ॥

चित्रलेखा—सखे, तुला खरच सांगतें, त्या देवांच्या शत्रूंचा पराभव झाला· आणि ते दुष्ट निराश होऊन पळून गेले·

उर्वशी—( डोळे उघडून ) काय प्रभावदर्शी इंद्रान कां त्यांचा पराभव केला ?

चित्रलेखा—अग इंद्रान नव्हे, पण इंद्रासारखेच पराक्रमी हे दयाळू पुरूरव राजे यांनीं त्यांचा पराभव करून तुला सोडवून आणल·

उर्वशी—( राजाकडे पाहून ) तर मग त्या राक्षसांचा हा माझ्यावर मोठा उपकारच समजला पाहिजे·

राजा—( उर्वशीकडे पाहून ) खरोखर ! नारायणऋषीच्या तपाचा भंग करण्या करितां अप्सरा गेल्या होत्या, त्यांना या उर्वशीला पाहून लज्जा उत्पन्न झाली, यांत कांहीं नवल नाहीं· कारण हिच लावण्यच तस आहे ! मला तर अस वाटत कीं:—

पद ( दैव योष दुर्विपाक० )

कांतिप्रद चंद्र, परम रसिक मदन वा ॥
निर्मी कीं कुसुममास सुतनु ही नवा ॥ धृ ॥
जो वेदाभ्यास करुनि मूढ जाहला ॥
नीरससा सकल विषय ज्यास वाटला ॥
निर्मिल तो जरठ काय कुसुम कोमला ॥

रमणी ही खचित नव्हे ऊरुसंभवा ॥ १ ॥

उर्वशी—गडे, माझ्या सगळ्या मैत्रिणी कुठे आहेत पण ?

चित्रलेखा—सखे, तें या महाराजांना माहित असेल.

राजा—(उर्वशीला) त्या सर्वजणी मोठ्या दुःखांत आहेत, कारण तूंच पहा कीं:—

पद (देखो सखीं कान्हया ०)

ज्या सदां वसति तुज जवळि पाहि ॥
हा विरह त्यांसि तरि नवल नाहिं ॥ धृ ॥
सहज एकदां दिसलिस ज्याला ॥
होईल विरहें व्यथित तो हि ॥ १ ॥

उर्वशी—(आपल्याशीं)

पद (बासरी बजावे कान्हा ०)

भाषण किति मधुर तरी ॥ होय सुधारसें ॥ धृ ॥

अथवा.

वर्षे जरि चंद्र सुधा ॥ अधिक त्यांत कायसें ॥ १॥

(राजास) ह्मणूनच त्यांना एकदां केव्हां पाहीन असें मला झालें आहे.

राजा—(दाखवून) त्या पहा-

साकी.

जैसे लक्षिति उत्सुकतेनें राहुमुक्त चंद्राला ॥
तैसें अवलोकिति त्या पाहे सख्या तुझ्या वदनाला ॥
हेमगिरी वरुनी ॥ उत्कंठित बहु होवोनी ॥ १ ॥

(उर्वशी उत्सुकतेनें पहाते.)

चित्रलेखा—सखे, इतक्या उत्सुकतेनें कुणाला पहातेस गी?

उर्वशी—अग जो आपल्या सुखदुःखाचा वाटेकरी झाला त्याला एकदां डोळे भरून पहाते.

चित्रलेखा—कोण तो?

उर्वशी—( गुप्त अभिप्रायानें ) अग कोण ह्मणजे! सखीजन.

सहजन्या—( हर्षानें मेनकेस. ) सखे, तो पहा राजर्षि, आपल्या मैत्रिणी चित्रलेखा व उर्वशी यांना घेऊन इक्डेच येत आहे. कसा दिसतो आहे पण! अगदीं विशाखा नक्षत्रांजवळ चंद्रच!

रंभा—गडे, त्या राक्षसापासून आपल्या सखीला सोडवून तिला बरोबर घेऊन हा राजा सुखरूप परत आला, हें फार चांगलं झालं.

मेनका—सखे, राक्षसांना जिंकायचं मोठ्ठं कठिण असं ह्मणत होतीस ना?

राजा—सूता, या हेमकूटपर्वताजवळ रथ उभाकर.

सूत—जो हुकुम. ( तसें करितो. )

( रथाखालीं उतरतांना उर्वशीचा राजास स्पर्श होतो. )

राजा— अहाहा!

दिंडी.

रथक्षोभें बाहूस बाहु लागे॥
अंगिं उठले रोमांच तया योगें॥
फुटती अंकुर हे साच मन्मथाचे॥
खरें झालें साफल्य या श्रमाचें॥ १॥

उर्वशी—( लाजून ) अग जरा पलीकडे हो!

चित्रलेखा—( हंसत )पलीकडे कुठें होऊं?

रंभा—या राजानं आपल्यांवर मोठा उपकार केला आहे. म्हणून त्याचा ही आपण सन्मान केला पाहिजे. ( सर्वजणी राजास सामोऱ्या येतात. )

राजा— सूता, जशी वल्लींना वसंतश्री, तशी ही सुंदरी आपल्या उत्कंठित सखींना भेटून येई पर्यंत रथ इथच उभा कर.

सूत—जी हुकुम महाराज ! ( रथ उभा करितो. )

सर्वजणी—आज महाराज विजयी झाले यानं आह्मांला मोठा आनंद झाला !

राजा—तुमची व तुमच्या सखीची भेट झाली, हा ही आनंद कांहीं कमी नाहीं !

उर्वशी—( चित्रलेखेचा हात धरून खालीं उतरून )

पद ( यतके नन्न यविती० )

भेटा कडकडुनी ॥ सखीनो ॥ धृ ॥ भेट
पुन्हां ही होईल तुमची ॥ नव्हतिच आशा
मजलागोनीं ॥ १ ॥

रंभा—महाराजांनीं चिरायु होऊन या पृथ्वीच सदोदित पालन करावं !

सूत—महाराज, पूरवके तरफसे घडघड घडवड ऐसा रथका आवाज सुन्नेमे आता है, मेरा ऐसा अंदाज है के—

साकी.

उतरे कोई अकासमेसे देख परत है मुझसे ॥
सोभत तन देखीये जिसकी सुन्नेके भूखनसे ॥
शिरपर परबतके ॥ मेघहि बिजलि साथ लेके ॥ १ ॥

सर्वजणी—( पाहून ) अगा बाई ! हे चित्ररथ गंधर्व आले.

चित्ररथ—(प्रवेश करून राजास ) राजा, स्वपराक्रमान आज तूं इंद्रावरही उपकार केलास, शाबास!

राजा—कोण गंधर्वराज ! प्रियमित्रा, ये ये !

( राजा व चित्ररथ एकमेकांस भेटतात. )

चित्ररथ—मित्रा—

पद.

केशी दानवाधम उर्वशीला हरण करि हें परिसुनी ॥
इंद्र धाडी विबुधसेना सुंदरीच्या मोचनीं ॥ १ ॥
मार्गीं किन्नरांच्या मुखींसर्वहि तुझा विक्रम ऐकुनी ॥
प्राप्त झालों नृपा येथें तुष्ट चित्तीं होउनी ॥ २ ॥

तर आतां—

पद ( शिव शिव ही निर्धनता० )

उर्वशिसह येवोनी भेट वासवा ॥
प्रिय त्याचें आचरिलें थोर भूधवा ॥ धृ ॥
पूर्वी त्या नारायणमुनिवरें दिली ॥
नारी ही इंद्रा त्वां आज अर्पिली ॥
अरिपासुनि हरण करुनि मित्रपुंगवा ॥ १ ॥

राजा—छे छे ! मित्रा, असं ह्मणूं नकोस. कारण—

पद ( सदर. )

हा प्रभाव सर्वहि त्या अमरपतीचा ॥
त्या योगें जिंकि रिपुस मित्रगण तयाचा ॥धृ॥
गिरिकंदरिं पंचानन गर्जना करी ॥
प्रतिशब्दें प्राणचि ते सोडिती करी ॥
तेवि आज मजासि होय विजयलाभ साचा॥ १ ॥

चित्ररथ—निरभिमानत्व हें एक पराक्रमाचं भूषणच आहे.

राजा—मित्रा, इंद्रदर्शनाला येण्याची ही वेळ नव्हे. यासाठीं तूंच उर्वशीला नेऊन इंद्राच्या स्वाधीन कर, ह्मणजे झालं.

चित्ररथ—जसं तुझ्या विचाराला येईल तसं.

(अप्सरांस) चलाव सर्वांनीं. (उर्वशी व चित्रलेखा या दोघीं शिवाय सर्व जातात.)

उर्वशी—सखे चित्रलेखे, ज्यांनीं आपल्यावर एवढा उपकार केला, त्यांना विचारल्यावाचून जाणं कांहीं बरोबर नाहीं. पण बाई माझ्याच्यानं त्यांच्यापुढें उभराहून बोलवायच नाहीं. तर तूंच कां माझ्या वाटचा निरोप घेइनास ?

चित्रलेखा—बर तर, मी घेते निरोप. (राजाजवळ जाऊन) महाराज ! उर्वशीची अशी विनंती आहे, कीं दुसरी प्रिय सखीच व अशी आपली कीर्ति बरोबर घेऊन स्वर्गलोकीं जायाची मला आज्ञा असावी.

राजा—बर आहे. तुह्मी आतां जा, परंतु लवकरच परत यालना !

(उर्वशी व चित्रलेखा आकाशमार्गानें जायाला निघतात.)

उर्वशी—(जातांना अडखळल्यासारखें करून)

ठुंबरी (लगाये लीनोजा॰)

या वेला गुंतली ॥ माळ कशी ही न सुटे
मज ॥ धृ ॥ तूं तरि येउनि सोडिव आतां॥
॥ सखये ॥ गति माझी खुंटली ॥ १ ॥

(असें ह्मणून राजाकडे बघत उभी राहते)

चित्रलेखा—(हंसून) छे बाई ! ही फारच वळकट गुंतली आहे. माझ्यान सुटण कठीण दिसत.

उर्वशी—पुरे गडे, तुझी सारीच थट्टा! सोडीव किंग.

चित्रलेखा—अग, ही सुटण्या जोगी नाहीं. पण सुटली तर पाहते बाई (माळ सोडविण्यास लागते.)

उर्वशी—सखे, या बोलण्याची तुला पक्की आठवण असूं दे बरका.

राजा—(आनंदानें.)

पद. (कारे हरी तू०)

लते खरिच तूं प्रियकरणी ॥ माल धरु-
निया मृगनयनेला करिसि उभी क्षणभरि
गमनीं ॥ धृ० ॥ पाहतसे मुरडोनि हलुच
ही ॥ दृष्टि पडे मुखचंद्र पुन्हां ॥ सुखवीत
मना ॥ भरला नयनीं ॥ १ ॥

(चित्रलेखा माळ सोडविते)

सूत—सुनो महाराज—

साकी.

सुरवैरीको मारा जिसने डुबा दिया सागरमों ॥
पवनअस्त्र ये फिरसे आके, बैठ गया शरधीमो ॥
भुजंग के जैसा ॥ आके बारुत्वमे घूसा ॥ १॥

राजा—ठीक आहे. तर मग रथ तयार कर.

(सूत तसें करितो. राजा रथारूढ होतो.)

उर्वशी—

ठुंबरी.

पडेल पुन्हां गांठ कधीं ॥ नकळे मज याची ॥धृ०॥
दानवासि जिंकुनि जो ॥ उपकारी होय खरा ॥
प्राणदान दे मला ॥

( असें ह्मणत, राजाकडे पाहत, व श्वासोच्छ्वास टाकीत सखीसह गंधर्वाबरोबर निघून जाते. )

राजा–( उर्वशीच्या मार्गाकडे पाहून ) या मदनाचा सपाट काय विलक्षण आहे पहा! जो कोणी याच्या पाशां त सांपडतो, तो दुर्लभ स्त्रीच्याही नादीं लागतो.

श्लोक ( हरिणी. )

जनक सदना जातां व्योमीं तनूंतुनि या मना ॥
सुतनु कशि ही नेते वेगें बळेंचि सुरांगना ॥
खुडुनि कमला जैसी हंसी मृणाल विदारुनी ॥
धरुनि वदनीं ओढी तंतू सवेंचि तयांतुनी ॥ १ ॥

( सूतासह जतो. )

## ( अंक १ ला समाप्त. )

---

# अंक २ रा.

( विदूषक प्रवेश करितो. )

विदूषक—काय करावं ! परान्नलंपट ब्राह्मणाचं अधाशीपणानं पोट फुगून जसं फुटायच्या बेताला येतं, तसं राजरहस्यानं माझं पोट फुटून जाईल कीं काय असं वाटतं. जीभ तरी किती अवरून धरूं ! बरं तर, आतां असं करतों. माझा मित्र राज्यकारभार आटपून येईपर्यंत या देवच्छंद नामक प्रासादावर निवांतसा जाऊन बसतों. म्हणजे तिथे फारशी मनुष्यं नसल्यामुळें माझ्याशीं कुणी बोलायचं तरी नाहीं.

( तदनंतर निपुणिका चेटी प्रवेश करिते. )

निपुणिका—सूर्योपस्थान करून महाराजांची स्वारी परत आली, त्या दिवसापासून महाराजांचं मन अगदीं उदास झालं आहे. तर हें कुणाच्या उत्कंठेनं ! हें त्यांचा प्रियमित्र माणवकभट त्याच्यापासून हळूच युक्तीनं काढून आण, अशी मला काशी राजकन्या राणीसाहेबांनीं आज्ञा केली आहे. तें त्या भटुर्ग्यापासून कसं बरं काढून घ्यावं! ( किंचित् विचार करून ) हातुतिच्यारे ! यांत मला इतका विचार तो कशाला पाहिजे ? कारण, गवताच्या पातीवर दहिंवराचा बिंदु जसा क्षणभरही ठरत नाहीं, तसं तें राजरहस्य फार वेळ कांहीं त्याच्या पोटांत रहायचं नाहीं. बरं तर, त्याचा आतां शोध करते.

( इकडे तिकडे फिरून व विदुषकास पाहून. ) तो पह माणवकभट आपल्याच मनाशीं कांहीं पुटपुटत वसल आहे. अहाहा ! ! काय दिसतोय पण. जस कांहीं एखाद चित्रांतल माकडच ! ! ( जवळ जाऊन नमस्कार करिते ) भार्या मी नमस्कार करिते.

विदूषक--( त्रासानें ) कल्याण कल्याण. ( आपल्याशीं ) या दुष्ट चेटीला पाहून तें राजरहस्य माझ हृदय विदारून बाहेर येत कीं काय अस वाटत. ( उघड ) निपुणिके तूं आपल गायच, नाचायच काम सोडून कोणीकडे ग निघालीस?

निपुणिका--भटजीबुवा राणीसाहेबांच्या आज्ञेवरून इकडेच आले आहे.

विदू०---अस काय! राणीसाहेबांची काय आज्ञा आहे तर?

निपु०--बाइसाहेबांच अस ह्मणण आहे कीं, आपली मजवर निरंतर ममता असल्यामुळें मला कांहीं दुःख होत असतां आपण कांहीं माझी उपेक्षा करणार नाहीं.

विदू०--निपुणिके, माझ्या मित्रान राणीसाहेबांच्या मनाला वाईट वाटेल अस कांहीं आचरण केल कीं काय?

निपु०--दुसर कांहीं नाहीं, ज्या स्त्रीची महाराजांना उत्कंठा लागली आहे, तीच ही, अस समजून तिच्या नांवान त्यांनीं राणीसाहेबांना हाक मारली.

विदु०---हं! एकूण ह्या राजेश्रींनीं आपल रहस्य आपणच फोडल वाटत! मग मी तर भट ! मला आपली जीभ कशी आवरणार ! ( निपुणिकेस ) काय राणी-

साहेबांना माझ्या मित्रान उर्वशी म्हणून हांक मारली कां ? तर मग आतां खर सांगतों. हे पहा, त्या उर्वशीच दर्शन झाल्यापासून, मांझा मित्र अगदीं वेडा होऊन गेला आहे. तो केवळ राणीसाहेबांनाच दुःख देतो अस समजूं नकोस; मला देखील त्याच्यापासून अलीकडे फार पीडा होते. कारण माझ्याशीं कधीं थट्टा नाहीं, मस्करी नाहीं, हसण नाहीं, कांहीं नाहीं ! रात्रंदिवस तिचा निजध्यास !

निपु०–( आनंदानें ) शाबास ! ह्या राजरहस्यरूपी किल्या-चा तर मी भेद केलाच. ( उघड ) तर मग भटजी, राणीसाहेबांना जाऊन काय सांगूं ?

विदू०–निपुणिके राणीसाहेबांना, माझी अशी विनंति सांग कीं, जेव्हां ह्या मृगतृष्णेपासून मी माझ्या मित्राला मा-घारा फिरवीन तेव्हांच हें तोंड आपल्याला दाखवीन.

निपु०–बर, कळविते तर अस. ( जाते. )

( पडद्यांत स्तुतिपाठक स्तुति करतात. )

महाराजांचा विजय असो :—

गद्य.

अधिकार तुझा, तेवि त्या तेजोनिधि स-
वित्याचा, समचि आम्हीं मानितों भूमि-
कांता ॥ करिसि विध्वंस तूं प्रजाजन
कुमति तिमिराचा, रविहि पळवी घोर
तमासि दिगंता ॥ दिवसाच्या षष्ठभागीं
क्षणभरि घेत विश्राम तो, तूं हि त्या स-
मयीं स्वच्छंदें आनंदविसि स्वांता ॥ १ ॥

विदू०-हा पहा माझा मित्र राज्यकारभार आटपून इकडेच येत आहे; तर आतां त्याच्या जवळ जावं. ( नंतर उत्कंठित झालेला राजा प्रवेश करतो. )

राजा-

पद ( कोन जाय ग्रिजमों० )

पाहिलि त्या क्षणिंच शिरे ॥
हृदयमंदिरांत कशी ॥ दिव्य सुंदरी ॥ धृ० ॥
नेम चळेना त्या मदनाचा ॥
पाडी तो तीव्रशरें ॥ छिद्र या उरीं ॥ १ ॥
त्या मार्गें ती गेली वाटे ॥
नकळे कां देत असा ॥ ताप अंतरीं ॥ २ ॥

विदू०—( मनांत ) त्या बिचाऱ्या राणीला जी पीडा होत आहे, ती खरी आहे.

राजा-मित्रा, तूं तें रहस्य गुप्त ठेवल आहेस ना ?

विदू०-( मनांत ) ह्मणजे ! हा ज्या अर्थी मला असं विचारतो, त्या अर्थी ही गोष्ट याच्याकडून फुटली नसावी. एकूण त्या लबाड चेटीन मला फसविल ह्मणायचं तर मग!

राजा-( शंकित होऊन ) कां? प्रश्नाचं उत्तर दिल नाहींस ?

विदू०-अशी-अशी मी आपली जीभ अवरून धरली आहे कीं तुला देखील एकदम उत्तर दिल नाहीं.

राजा-शाबास ! असच पाहिजे. पण माझ मन उद्विग्न झाल आहे, तें कोणत्या उपायान स्वस्थ होईल बर ?

विदू०-चल, स्वयंपाक घरांत जाऊं.



राजा-तिथं कशाला ?

विदू०—कशाला ह्मणजे? तिथ नानाप्रकारचीं पक्वान्न तयार करुन ठेविलीं आहेत. त्यांतले एक दोन लाडू ह्मण, दोन मोदक ह्मण, खालेस ह्मणजे झाल.

राजा—मित्रा, ते पदार्थ खाऊन तुझ्या मनाला मात्र स्वस्थता येईल. परंतु मला जी वस्तु पाहिजे ती फार दुर्मिळ आहे. ती मिळाल्यावाचून माझ्या मनाला कशी वर स्वस्थता येईल ?

विदू०—वर, मी तुला अस; विचारतो कीं, तूं या उर्वशीच्या कधीं दृष्टीस पडला आहेस का ?

राजा—हो, पडलों आहें, मग ?

विदू०—तर मग ती तुला मुळींच दुर्भिळ नाहीं.

राजा—(मनांत) याच ह्मणण पक्षपाताच आहे. (उघड) मित्रा पण ती इतकी रूपवती आहे, कीं तिच्या रूपाला दुसरी उपमाच नाहीं.

विदू०—तूं तिच इतक वर्णन करतात, ह्मणून मी तुला विचारतों कीं मी जसा अद्वितीय कुरूप तशी ती अद्वितीय सुंदर आहे का ?

राजा—तुला काय सांगू मित्रा ? ती इतकी रूपवती आहे कीं तिच्या संपूर्ण अवयवाच वर्णन करण तर माझ्या हातून व्हायचच नाहीं, पण थोडक्यात सांगतो. ऐकः -

पद ( कशें मी मारू, माझे नवऱ्याचें० )

आभरणाचें ॥ आभरण होय ती साचें ॥ धृ० ॥

जीं जीं शोभाद्रव्यें तयां ॥ शोभा देत तिची ती काया ॥



उपमानाचें ॥ उपमान जाण वपु तीचें ॥ १ ॥

विदू०—ह्मणूनच बर! ह्या सुरांगनेच्या नादीं लागून तूं हे चातकाच व्रत धरलस ?

राजा—ह्मणजे काय रे ?

विदू०—ह्मणजे, मेघजलाच्या आशेन चातक जसा वर मान करून मेघवृष्टीची वाट पाहत बसतो, तसा तूं या उर्वशीची आशा धरून बसला आहेस.

राजा—कांहीं ह्मण मित्रा, पण उर्वशीची उत्कंठा फार लागल्यान मला गारशा एकांता वाचून चैन पडायच नाहीं. मला प्रमदवनांत घेऊन चल.

विदू०—( मनांत ) करता काय, गेल पाहिजे, इलाज नाहीं. ( उघड ) अस इकडून याव महाराज. हा दक्षिणेकडून किती गार वारा येत आहे. मला वाटत कीं आपण येणार ह्मणून त्या प्रमदवनान आपला आदर करण्याकरितांच याला सामोर पाठविल असाव.

राजा—( हंसून ) मित्रा, तुझा तर्क बरोबर आहे. तसच, या वायूला दक्षिणवायु हे नांव अगदीं योग्य आहे. कारणः—

अंजनी गीत.

पुष्पकालीं हा मधुलतिकेला ॥
सिंचन करुनी सुखवी तिजला ॥
लावी नुसतें डोलायाला ॥
कुंदलतेला या ॥ १ ॥
सत्य प्रेमा एकी वरती ॥
दाविं दुजीवरि लटकी प्रीती ॥
पाहुनि ऐसें वाटे चित्तीं ॥

कामी हा साचा ॥ २ ॥

विदू०—महाराज, आपल हीं वर्तन सध्यां या वायूप्रमाणच्च आहे. ( इकडे तिकडे फिरून ) महाराज, हेंच प्रमदवनाच द्वार. चलाव आंत.

राजा—अगोदर तूंच हो पुढें. ( दोघे आंत जातात. ) मित्रा, प्रमदवनांत गेलों असतां माझी व्यथा कांहीं तरी कमी होईल अस वाटत होत. पण नदीच्या ओघांत सां-पडलेल्या मनुष्याला उलट पोहून जाण जस कष्टदायक होत, तस माझ इथ येण झाल.

विदू०—तें कस बर ?

राजा—ऐकः—

साकी.

वांछी दुर्लभ वस्तुस मन जं, आधिंच मदनें झुरतें ॥
तशांत पानें गळलीं ऐशा आम्रतरूचे बघ ते ॥
अंकुर नव दिसती ॥ पीडा दुःसह मज देती ॥ १ ॥

विदू०—हें पहा, आतां उगीच दुःख करूं नकोस. थोडक्याच्च वेळांत प्रत्यक्ष मदन तुला साह्य होऊन तुझा इष्ट हेत पूर्ण करील.

राजा—मी या ब्राम्हणवचनाचा मोठ्या आनंदान स्वीकार करितों.

विदू०—मित्रा, वसंतकाळ समीप आला, अस सुचविणारी या प्रमदवनाची शोभा तरी पहा. किती रमणीय दिसते ता !

राजा—ती तर मला प्रत्येक वृक्षाच्या ठिकाणीं दिसते, हें पहाः—

पद ( परम सुवासिक पुष्पें ० )

कोराटीची कलिका वरती खीनख्सम्र आरक्त असे ॥ तैसी दोहों बाजुंस खालीं श्यामवर्ण बहु रम्य दिसे ॥ १ ॥ अशोक तरुची बालकली ही तांबुस सुंदर फुललि नसे ॥ अल्प रजांनीं युक्त सुकोमल आम्रमंजरी ही विलसे ॥ २ ॥ या उद्यानीं शोभा ऐसी पाहुनि मजला वाटतसे ॥ बाल्य तरुणपण या दोहोंच्या मधें मधुश्री शोभतसे ॥ ३ ॥

विदू०–अरे मित्रा, ही पहा इथ वासंतीलतेची मंडपाकार कशी सुरेख जाळी आहे. तिच्या आंतल्या बाजूला तो इंद्रनीलमण्याचा चौरंग आहे, आणखी त्यावर भ्रमरांच्या संघट्टनान हीं पुष्प गळून पडलीं आहेत, पहा. हा सर्व थाट पाहून हें प्रमदवन आपलीच वाट पाहत आहे कीं काय असं वाटत. तर मित्रा, याच्यावर अनुग्रह कर.

राजा–बर तर ( असें म्हणून बसतो ).

विदू०–हां, आतां इथें स्वस्थ बसून या रम्य लतेकडे दृष्टि लाव, आणखी उर्वशी विषयींची जी तुझ्या मनांत उत्कंठा आहे, ती घालीव कशी.

राजा–( श्वास सोडून ) छे मित्रा, काय सांगतोस हें !

अंजनी गीत.

दिव्य रूप तें बघुनि तियेचें ॥
नयनां लागे वेडचि साचें ॥

मग लतिका ही पाहुनि त्यांचे ॥
रंजन केवि घडे ॥ १ ॥

तर ती मला पुनः दिसेल असा एखादा उपाय सांग.

विदू०—मी उपाय सांगूं ! वः अहिल्येवर लंपट झालेल्या इंद्राचें वज्र, आणि उर्वशीवर लंपट झालेला तुझा मी, हे दोघेही असल्या कामांत अगदीं निरुपयोगी.

राजा—अरे तूं माझा प्रिय मित्र असल्यामुळें तुला कांहीं तरी उपाय सुचेल ह्मणून ह्मणतों.

विद०—पहातो सुचतों कां. पण तूं असल रडगाणं लावून माझ्या समाधीचा भंग करणार नाहींस तर पाहतो.

राजा—नाहीं करीत, झाल.

विदू०—मग हा बसलों विचार करीत. (डोळे मिटून बसतो.)

राजा—हा माझा दक्षिण बाहू कां बर स्फुरूं लागला ?

पद (परिणिले न मुनिकन्येला०)

नच साध्य होय सुरललना ॥
मज ठावें ती शशिवदना ॥ करूं कसें ॥ धृ० ॥
परि मदनविचेष्टित देते ॥
आनंद बहुत चित्ताते ॥ हें कसें ॥
कां इष्टफलाची होते ॥
प्राप्ति हें मला उमजेना ॥ करूं कसें ॥ १ ॥

(इतक्यांत विमानांत बसून चित्रलेखा व उर्वशी येतात.)

चित्र—सखे, कांहीं कारण सांगितल्यावाचून निघालीस तरी कुठें तूं ?

उर्वशी–अग, त्या हेमकूट पर्वतावर एका वेलीला माझी माळ गुंतली तेव्हढी सोडीव, अस मी तुला म्हटल, त्या सरशी 'छे बाई! ही फार बळंकट गुंतली आहे, माझ्यान नाहीं सुटायची, अस म्हणून माझी थट्टा केलीस, नि आता अस विचारतेस कां?

चित्र०–अस्स अस्स! समजले. त्या पुरूरव राजाकडे चाललीस होय?

उर्वशी–होय. पण हें माझ करण निर्लज्यपणाच वाटल बाई.

चित्र०–अग, पण तूं येणार म्हणून कळवायला पुढ कुणाला पाठिवल आहेस?

उर्वशी–कुणाला म्हणजे? मी आपल्या मनाला पाठविल आहे.

चित्र०–पण तिकडे जाण्यापूर्वी नीट विचार कर हो. इतकी उतावळी होऊं नकोस.

उर्वशी–अग, उतावळी कसली आणि विचार तो काय करायचा! मी आपण होऊन कां जाते, पण तो मदन मला ओढून नेतो आहे. मी तरी काय करूं वर!

चित्र०–झाल या पुढ बोलणच खुंटल.

उर्वशी—तर मग गडे, मी तिकडे जातांना वाटेंत कुठ विघ्न येणार नाहीं असा मला मार्ग दाखीव.

चित्र०—अग, त्याची तुला अगदीं काळजी नको. आम्हांला दैत्यापासून पीडा होऊं नये म्हणून भगवान बृहस्पतींनीं अपराजिता नांवाची शिखाबंधिनी विद्या सांगितली आहे ना? मग का भितेस?

उर्व०—सखे, गडे त्याची मला आठवणच नव्हती.

चित्र०—सखे, आह्मीं कुठ आलों पाहिलस कां ? गंगायमुनेच्या पवित्र संगमांत प्रतिबिंब पडल आहे तें, ते राजमंदिराचच. या प्रतिष्ठान नगरीत्र तें शिरोभूषणच दिसत नाहीं ?

उर्व०—खरच गडे ! हें स्थान ह्मणजे मध्यलोकचा स्वर्गच, अस मला वाटत. पण दीनावर दया करणारा तो राजर्षि कुठ असेल वर ?

चित्र०—नंदनवनासारख हें प्रमदवन दिसत आहे, त्यांत जाऊन पाहूं चल, म्हणजे समजेल. (जातात.) सखे, हा पाहिलास कां ? नुकताच उदय पावलेला चंद्र, जसा चंद्रिकेची अपेक्षा करितो, तसा हा राजा तुझीच अपेक्षा करीत वसला आहे.

उर्व०—(पाहून) गडे ! माग पाहिला होता त्यापेक्षां हा राजा आज मला फार सुंदर दिसतो.

चित्र०—अग, दिसायचाच ! चल तर आतां जवळ जाऊं.

उर्व०—नको वाई ! मी अगोदर गुप्त रूपान उभी राहून महाराजांचा नि माणवकभटाचा कायसा एकांत चालला आहे, तो ऐकते.

चित्र०—वर तर. तस कर. ( दोघीही आड उभ्या राहतात. )

विदू०— मित्रा, सुचला उपाय. तुझी प्रिया तुला कशी दिसेल, याचा मला उपाय सुचला.

उर्व०—महाराजांना इतकी उत्कंठा लागली असून अजून त्यांचा अंत पाहणारी अशी कोण वर भाग्यवान स्त्री ही ?

चित्र०—गडे, अस मध्यलोकच्या माणसासारख काय विचारतेस ती. अंतर्ज्ञानान पहा, ह्मणजे समजेल कोण ती.

उर्व०--मला बाई तस करायची भीति वाटते. माझ्या शिवाय दुसरीच कोणी असली ह्मणजे उगीच--

विदू०--मित्रा, उपाय सुचला ह्मणतो ना !

राजा--कोणता तो सांग, सांग पाहूं.

विदू०--ऐक, तूं आतां सडकून झोंप घे. ह्मणजे स्वप्नांत तिचा आणि तुझा समागम होईल; हा एक. अथवा त्या उर्वशीची एका चित्रपटावर सुंदरशी तसबीर काढून तिच्याकडे एकसारखा पहात बैस, हा दुसरा.

उर्व०--(आनंदानें) मना, थोडा धीर धर. इतकी घाई करूं नकोस.

विदू०--कां ?

राजा--छेरे मित्रा ! हे दोन्ही उपाय व्यर्थ आहेत.

ठुंबरी ( गोकुलसे श्याम० )

स्मरबाण सलति हृदयांत सदां ॥ मज
झोंप नये पळ एक कदां ॥ धृ० ॥ स्वप्नीं सं-
गम मग कोठुनि तो ॥ काढावी छबि
चित्रपटीं ॥ अश्रुजळें नच खळती मित्रा ॥
दृष्टि होत ही अंध तदा ॥ १ ॥

चित्र०--सखे, ऐकलसना हे ?

उर्व०--होय बाई, पण अजून मनाची तृप्ति नाहीं झाली.

विदू०--झाल तर मग ! आमची अक्कल काय ती इतकीच.

राजा०( श्वास सोडून )

पद ( मी कुमार ती० )



अनिकठिण रोग हा माझा ॥ निजला कां

उवा नाहीं ॥ धृ० ॥ अथवा ती दिव्य-
ज्ञानें ॥ जाणते घडे जें कांहीं ॥ मग करी
उपेक्षा कारे ॥ हे क्लेश सुखानें पाही ॥
॥ चाल ॥ जो सर्वी मनोरथ केला ॥ ने-
उनि तो निष्फळतेला ॥ नृप स्थर होवो,
मजला ॥ विरहाच्या लोटुनि डोहीं ॥ १ ॥

चित्र०—गडे ऐक.

उर्व०—

पद ( रुके मोरे गैलया० )

मजसि मानितात अशी ॥ सखे करुं काय ग ॥ धृ० ॥
त्या समोर जाउं कशी ॥ उत्तर तरि देउं कशी ॥
धीर होत नाहिं मजसि ॥ सखे करुं काय ग ॥ १ ॥

तर मग आतां मी आपल्या प्रभावानं एक भूर्जपत्र नि-
र्माण करो,नि त्याच्यावर माझ्या मनांतला उद्देश लिहून
त्यांना कळवितें.

चित्र०—हो गडे ! बरी आहे ही युक्ति. लिही तर, आणि टाक
त्यांच्या पुढं.

( उर्वशी भूर्जपत्रावर कांहीं लिहून राजापुढें तें टाकते. )

विद०—अरे अरे ! हें काय ! हें काय ! सापाच्या कातीं सारखं
काय पडलं हें !

राजा०—( हंसून ) हा मुर्खा ! कात नव्हे, भूर्जपत्र आहे हें; सम-
जलास ? आणि त्याच्यावर कांहीं लिहीलं आहे वाटतं.

विदू०—हां समजलों आतां ! इथच कुठं तरी गुप्त स्थान उभं
राहून त्या उर्वशीनं तुम्ही शोक एकलो असेल, आणखी

तुझ्या प्रमाणच माझी प्रीति आहे, अशा अर्थाचा हा लेख
लिहून टाकला असेल, असा माझा तर्क धांवतो.

उर्व०—आर्या चांगल बोललास. तूं मोठा चतुर आहेस.

राजा—हो ! मनोरथच करायचे मग काय कमी !

विदु०—नाहीं, पण त्यांत काय लिहिल आहे तें मला ऐकायचच.

राजा—( पत्र पाहून )मित्रा तुझा तर्क अगदीं खरा आहे.

विदू०—हं ! तर मग मोठ्यान वाच पाहूं.

राजा—ऐक ( वाचतो ).

पद ( अभिनव मधु० )

मजवरि अनुराग तुझा, तेवि तुजवरी ॥
न करी मी, म्हणासि असें नेणतां जरी ॥ धृ०॥
पारिजातकुसुमशयनिं सुख मला नसे ॥
नंदनवनपवन तनुस ताप देतसे ॥
व्हाया हें कारण मग कोणतें तरी ॥ १ ॥

उर्व०—महाराज आतां काय ह्मणतील बर ?

चित्र०—अग, ह्मणायच तें काय आणखी ? महाराजांच सर्व शरीर कमलाच्या देंठाप्रमाण सुकून गेल आहे; या वरून नाहीं का समजत ?

विदू०—शाबास मित्रा ! शाबास. मी बुभुक्षित असतांना मला जस एखाद पंचपक्वान्नाच आमंत्रण मिळाव, तस तुला हें आश्वासन मिळाल ह्मणायच !

राजा—अरे, आश्वासन ह्मणून काय ह्मणतोस ? पहा:—

पद ( काय सांगे सखि० )



किति तरि पद सुंदर हें ॥ अर्थ हि केवळ

मधुरस वाहे ॥ धृ० ॥ प्रेम सम चि उभ-
यांचें ॥ सुचविति ऐसें शब्द पदाचे ॥
अवलोकन मी याचें ॥ करितां नयनीं
वाटे साचें ॥ चुंबन त्या सुंदरिचें ॥ या
वदनें मी घेतचि आहे ॥ १ ॥

उर्व०—तर मग, उभयतांची प्रीति सारखीच आहे ह्मणायची.

राजा—मित्रा, हाताच्या घामान हीं अक्षरं मळतात. तर हें भू-
र्जपत्र तुझ्या जवळ असूंदे.

विदू०—( घेऊन )तीं उर्वशी हें मनोरथपुष्प तुला दाखवून,
त्याच फळ देणार नाहीं ह्मणतोस? छेः असं व्हायचच नाहीं.

उर्व०— सखे, महाराजांबरोबर बोलायचा मला धीर येईतों
तूंच पुढ होऊन माझ्या मनांतल त्यांना कळीव, ह्मणजे झाल.

चित्र०—( होय ह्मणून राजापुढें होऊन ) महाराजांचा जयजय
कार असो.

राजा—( आनंदानें )कोण ! चित्रलेखे, ये. ( तिच्या मागें पाहून)
चित्रलेखे :—

दिंडी.

जान्हवीसह यमुनेस तुजसि तेवी ॥
सखिसह मी पाहियलें पूर्वीं ॥
हर्ष जैसा त्या समयिं मला झाला ॥
होत नाहीं तुज बघुनि एकटीला ॥ १ ॥

चित्र०—आपण ह्मणता तें खर. पण पहिल्यान मेघमाला
यायची, आणि तिच्या मागून वीज. वीज आधीं कशी
येईल महाराज !

विदू०-( आपल्याशीं ) मी समजलों कीं हीच उर्वशी. पण चुकलों. ही वेटी उर्वशीची सखी !

चित्र०-महाराज उर्वशीची आपल्याला एक विनंति आहे.

राजा-विनंति ! भलतच ! तिची काय आज्ञा आहे ?

चित्र०-जस पूर्वीं राक्षसापासून आपण माझ रक्षण केलं, तसच आपल्या दर्शनान उत्पन्न झालेला मदन मला फार ताप देतो; तर त्याच्यापासूनही माझ रक्षण करावं.

राजा-प्रियवदने !

पद [ कांहीं बोलो महाराज० ]

देतो ताप मदन काय ॥ उत्सुक झाली
म्हणसि सखी ती, लागुनि माझी हाय ॥
॥ धृ० ॥ मी ही कामाकुल तिजसाठीं,
सुंदरि कां न पहासी ॥ मदनाचा हा प्र-
साद, झाले तप्तचि दोन्हीं काय ॥ १ ॥
म्हणुनि सांगतो तप्तलोह तें, तापविल्या
लोहाशीं ॥ योग्य होय गे सांधायाला,
हाचि एक सदुपाय ॥ २ ॥

चित्र०-( उर्वशीजवळ जाऊन ) सखे, तुझ्या प्रियकराची अवस्था त्या मेल्या मदनान अगदीं तुझ्यापेक्षां भयंकर करून सोडली आहे ! तर त्याची मी दूती म्हणून सांगतें कीं आंत जा आतां.

उर्व०-( थोडी पुढें होऊन ) अग ! काय निर्दय आहेस ग ! मला एकटीला सोडून चाललीस नां !

चित्र०-कशाला बोलू ! आतां समजेल कोण कुणाला सो-

डून जाईल तें. पण महाराजांना नमस्कार कर जा अगोदर. ( उर्वशी जयजयकार ह्मणून नमस्कार करते ).

राजा–( अत्यानंदानें ) सुंदरी:–

साकी.

इंद्रावाचुनि जयशद्बें त्वां कवणा हि न आदरिलें ॥
आजवरी परि त्या शद्बें मज लोकीं धन्यचि केलें ॥
सख्ये या समयीं ॥ झालों ज्ञाण खरा विजयी ॥ १ ॥

( तिचा हात धरून खालीं बसविते. )

विदू०–काय ग ए! प्रत्यक्ष राजाचा प्रियमित्र मी! त्यांतून ब्राह्मण! असे असून तूं मला नमस्कार करीत नाहींस काय? आं!!

(उर्वशी किंचित् हंसूननमस्कार करते. विदूषक कल्याण असें ह्मणतो इतक्यांत देवदूत पडद्यांत बोलतो )

देव०–चित्रलेखे उर्वशीला घेऊन चल लवकर. कारण:–

ओवी.

अभिनयसुंदरसुरसीं भरला ॥
भरतमुनींनीं तुह्मां शिकविला ॥
प्रयोग ऐसा पहावयाला ॥
इंद्र इच्छी देवांसवें ॥ १ ॥

चित्र०–सखे, देवदूत काय ह्मणाला तें ऐकलसना? महाराजांचा निरोप घे तर मग आतां.

उर्व०— माझ्या नाहीं बाई तोंडांतून शब्द निघायचा! तूंच–

चित्र०—बर तर मीच घेतें. ( राजास ) महाराज, उर्वशीची अशी विनंति आहे कीं मी परतंत्र, म्हणून न गेले, तर इं-

द्राची आज्ञा मोडल्याचा दोष माझ्यावर येईल; तो न या
म्हणून मला परत जायची आज्ञा असावी.

राजा—( दुःखानें ) तुह्मीं आपल्या स्वामीची आज्ञा मोडावी असं माझं ह्मणण नाहीं. इतकच कीं, माझं स्मरण असा

( उर्वशी वियोग दुःख दाखवून सखीसह निघून जाते )

राजा—मित्रा, आतां हे डोळे असून व्यर्थरे व्यर्थ !

विदू०—अरे व्यर्थ कां ? हें पहा, ( घाबरून आपल्याशीं ) अरे काय झाल ! त्या उर्वशीच्या दर्शनान मीं अगदीं भांबाव गेल्यान, माझ्या हातांतून तें भुर्जपत्र केव्हां गळून पडल तें सुद्धां मला समजल नाहीं. आतां काय करावं !

राजा—अरे अर्धाच कां थांबलास ? काय बोलणार तें बोल

विदू०—नाहीं—मी ह्मणत होतो—कीं हें पहा तूं असा निरा होऊन हातपाय गाळूं नकोस. ऊर्वशीची तुझ्यावर खरं प्रीति आहे.

राजा—हो, मलाही असच वाटतं. कारण तिन माझा निरो घेऊन जातांनाः—

पद ( ही मुरली गुंगवी० )

मन मजला वाहिलें ॥ दुसऱ्याची तनु परि आपुलें ॥धृ०
स्तनदेशीं जो हार फुलांचा ॥ लोळत होता बहु भाग्याचा
निश्वासें हो कंप तयाचा ॥ पाहुनि हें मी ताडिलें ॥ १

विदू०—( आपल्याशीं ) माझ काळीज धडधडायला लाग आहे. कारण हे राजश्री त्या भूर्जपत्राच नांव के काढतील कोण जाणे.

राजा—मित्रा, आतां मी या दृष्टीच रंजन कशान करूं ! (

ठून ) खरच! तें माझ्या प्रियेनं लिहिलेलं भूर्जपत्र दे पाहूं

विदू०—तेंच मी पाहतो आहे रे! पण तें कुठं सांपडत नाहीं, काय करावं! आहा!—मला वाटतं तें उर्वशीच्या मागूनच उडून गेलं असावं. नाहीं तर—

राजा—चल मूर्खा! नेहमीं तुझी अशीच धांदल. पहा पहा कुठं गेलं तें. ( दोघेही शोधीत जातात. इतक्यांत राणी व निपुणिका येतात. )

राणी—निपुणिके! महाराज व माणवकभट लतामंडपांत गेलेले मी पाहिले, असं सांगितलंस तें खरंच ना पण?

निपु०—पण बाईसाहेब, या पायापाशीं आजपर्यंत मी कधीं तरी खोटं बोललें आहे कां?

राणी—तर मग मी या जाळीच्या आड उभी राहून, त्यांचा काय एकांत चालला आहे तो ऐकते.

निपु०—बरं तर बाईसाहेब.

राणी—( पुढें होऊन ) निपुणिके, अग हें दक्षिणेकडून वायना चिंधीसारखं काय उडत येत आहे पहा बरं.

निपु०—( पाहून ) बाईसाहेब, हें भुर्जपत्र दिसतं; आणि त्याच्यावर कांहीं लिहिलेलं आहे वाटतं अगबाई! पण हें बाईसाहेबांच्या अगदीं तोरडीलाच येऊन लगटलं! वाचून तरी पाहूं का?

राणी—वाच, पण त्यांत माझ्याविरुद्ध कांहीं नसेल, तर मी ऐकेन.

निपु०—( वाचून ) बाईसाहेब, हें सगळं त्या उर्वशीचंच कौटळ. महाराजांना उद्देशून उर्वशीनं रचलेलं पद्य याच्यावर लिहिलं आहे. हें [illegible] त्या माणवकभटाच्या हल-

गर्जीपणान आपल्या हातीं लागल.

राणी—वर ह्यांतला मतलब काय आहे पाहूं ! ( निपुणि॰ वाचते). आण तर—हीच भेट घेऊन मी त्या अप्सरालं॰ महाराजांना जाऊन भेटते. आण इकड तें भूर्ज॰ ( घेते. दोघी निघून जातात ).

विदू॰—अरे तें पहा, प्रमदवनांतल्या क्रीडापर्वताजवळ का॰ दिसत आहे. मला वाटत तेंच तें.

राजा—हे भगवंता ! वसंतप्रिया ! दक्षिण मारुता !

पद ( वसंतीं वद्युनि॰ )

लतिका-कुसुमपरागातें ॥ नेइ हरुनि बा,
सेवाया त्या मधुर सुवासातें ॥ १ ॥ परि
मद लाभ काय नूतें. ॥ सखिनें लिहिलें
प्रीतिपत्र जें हरण करुनि त्यातें ॥ २ ॥
कंठिति कामी प्राणांतें ॥ मन रमवाया
संग्रहिं ठेउनि ऐशा वस्तूंतें ॥ ३ ॥

निपु॰—( येऊन ) बाईसाहेब, हें पाहिलत नः ? ह्या भूर्ज॰ त्राचाच शोध चालला आहे !

राणी—पाहिल ग ! उगीच रहा तूं.

विदु॰—अरे फसलोंरे फसलों ! हें बेट निळ्या कमळाच्या ॰ गाच मोराच पीस हें ! मला वाटलं भूर्जपत्र असेल.

राजा—हर हर ! माझा सर्वथैव घात झाला !

राणी—( पुढें होऊन )महाराज, इतक कांहीं कासावीस व्हाय॰ नको. हें घ्या आपल भूर्जपत्र.



राजा—( गडबडून ) कोण प्रिये, तूं का ? तुझ स्वागत अ॰

विदु०—( मनांत ) स्वागत कसलं हें कपाळाच ! दुरागत हें.

राजा—( मित्रास ) आतां हिला काय रे बहाणा सांगूं ?

विदु०—महाराज ! मुद्देमालासकट चोर सापडल्यावर बहाणा कसला सांगणार ?

राजा०—भलत्याच वेळीं काय थट्टा! ( राणीस ) प्रिये, मी हें भूर्जपत्र शोधीत नव्हतों. दुसरच कांहीं होत, तें आपल—

राणी—हो हो ! तें समजल. अशा वेळेला असच बोलून वेळ साजरी केली पाहिजे.

विदु०—बाईसाहेब, लवकर जाऊन आधीं महाराजांच्या भोजनाची तयारी करा; ह्मणजे यांच चित्त शमून हे ताळ्यावर येतील.

राणी—निपुणिके, या भटान आपल्या मित्राला चांगल संभाळून घेतल !

विदु०—तस नव्हेहो बाईसाहेब! चांगल भोजन घातल ह्मणजे पिशाच्च सुद्धां शांत होतं, ह्मणून ह्मणतों.

राजा—मूर्खा, बळेनच माझ्यावर अपराध लागू करतोस वाटत?

राणी—महाराज, आपला कसला अपराध? भलतच ! अपराध माझा. कारण मी इथ येऊन आपल्या आनंदाचा विरस केला. चल ग निपुणिके—

राजा—छेः छेः !

पद [ किति सुंदर तरि० ]

अपराधी मी साच तुझा परि, प्रीति धरी चित्तीं ॥
कोप नको हा करि अनुकंपा; आतां मजवरती ॥ १ ॥
सेव्य तूं मज नव सेवक मी, कोप नकि तुजला ॥

आला, तरि हा जन अपराधी न्यायानें ठरला ॥ २ ॥

( राणीच्या पायां पडतो. )

राणी—या पायापडण्याच मला कांहीं वाटत ना; कारण हें मेल सगळ ढोंग आहे. पण मी ... कडे लक्ष दिल नाहीं, ह्मणून पुढ मला वाईट वा... कीं काय, कोणजाणें ( असें ह्मणून रागानें निघून जाते.

विदु०—पावसाळ्यांतल्या गढूळ नदी प्रमाण वाईसाहेब ... रागारागान निघून गेल्या. उठा उठा महाराज आतां!

राजा—( उठून ) मित्रा हें अस व्हायचच ! कारणः—

पद [ वस्त्रानें देह सारा० ]

जरि नुसतें आर्जविलें, प्रियवचनें बोलुनी ॥
नच फसती चतुर नारी, झटिकीं तीं मानुनी ॥
मणि जैसा रंग खोटा, त्यावरती चढवुनी ॥
दाखवितां मार्मिकांनां, देती कीं फेकुनी ॥ १ ॥

विदु०-पण यांत तुझ काय बिघडल ? त्यांच जाण उल... तुझ्या पथ्यावरच पडल. कारण नेत्ररोग झाला असल... म्हणजे माणसाच्यान दिव्याच्या ज्योतीकडे बघवत नाही कां ! असच ना !

राजा--छे छे मित्रा,उर्वशीवर जरी माझ मन बसल आहे, तरी राणीला बहुमान द्यायचा, तो दिलाच पाहिजे. अरे ... माझ्या विनवणीकड लक्ष दिल नाहीं, यान तर मला जा... जोर आला.

विदु०—महाराज, पुरे करा ह्या जोराच्या गोष्टी आतां ! मी

झा प्राण भुकेन कासावीस झाला आहे, स्नानाची वेळ झा-
ली; तर चला आतां–आमच्या पोटाची कांहीं व्यवस्था
लावूंद्या.

ज्ञा–( वर पाहून ) खरच ! दोनप्रहर टळली.

पद ( धन्य उषा ही )

वेतापानें त्रस्त शिखी तो गार तरुच्या तलिं बसला ॥
ारुनि पांगाऱ्याच्या कलिका, भ्रमर अंतरीं तो शिरला ॥ १ ॥
जुनि तप्तजल, कारंडव ही, सेवी तटिच्या नलिनीला ॥
ाक्रांत तो पंजरस्थ शुक, मागतसे जल प्यायाला ॥ २ ॥

( सर्व जातात. )

अंक २ रा समाप्त.

# अंक. ३

( दोन भरतमुनींचे शिष्य येतात. )

गालव –कायरे पल्लवा, गुरूजींनीं मला इथ अग्निसंरक्षण वून तुला आसन देऊन बरोबर नेल होत, ह्मणून मी विचारतों, कीं आमच्या गुरूजींनीं जो इंद्रसभेंत प्रयो रून दाखविला, तो पाहून सर्व देवांना आनंद झाला

पल्लव–अरे त्यानां आनंद झाला कीं नाहीं, हें कांहीं मला जलं नाहीं. पण सरस्वतीकृत जें लक्ष्मीस्वयंवर त्याच्या भिन्नभिन्न रसांत ती उर्वशी अगदीं तल्लीन गेली. परंतु–

गालव–तुझ्या या परंतु शद्वा वरून तिथ कांहीं तरी चूक असावी अस वाटतं!

पल्लव–चूक तर! उर्वशी बोलण्यांत चुकली.

गालव–काय चुकलीरे?

पल्लव–त्या प्रयोगांत उर्वशीनं लक्ष्मीचा वेष घेतला आणि मेनकेनं वारुणीचा वेष घेतला होता; तेव्हां, वारुणीन विचारलं, कीं या इंद्रसभेंत महाविष्णु, लो तसेच त्रैलोक्यांतील सर्व देव बसले आहेत. तर तुला कोण आवडतो?

गालव–वर मग पुढें?

पल्लव–अरे पुढें काय! पुरुषोत्तम ह्मणायचं, तें न ह्मणतां असं ह्मणाली.

गालव–अरे अरे! नशीबापुढें इंद्रियांच काय चालणार! बर मग तिच्यावर आमचे गुरूजी रागावले असतील ?

पल्लव–अरे हो ! रागावले काय ह्मणतोस ? त्यानीं तर तिला एकदम शाप दिला.

गालव—तो कायरे ?

पल्लव–गुरूजींनीं असा शाप दिला, कीं ज्या अर्थी तूं माझी आज्ञा मोडलीस, त्या अर्थीं तूं माझ्या शापानं मृत्युलोकीं जाशील, आणि तुला तुझ्या दिव्य ज्ञानाचा विसर पडेल. हा शाप ऐकल्या बरोबर उर्वशीचं तोंड अगदीं उतरून गेल. तें पाहून इंद्र तिला ह्मणाला, कीं ज्या पुरूरव राजा-वर तुझ मन बसलं आहे, तो मोठमोठ्या युद्धांत माझ सहाय्य करीत असतो. या करितां मला ही त्याचं प्रिय केल पाहिजे. तर तूं त्याच्या जवळ जाऊन सुखानं रहा. मात्र, तुला पुत्र होऊन तो राजानं पाहिला, कीं तुला परत आलं पाहिजे.

गालव–इंद्र ह्मणजे दुसऱ्याच अंतरंग जाणणारा ! तेव्हां त्यानं केल तें योग्यच केल.

पल्लव–( सूर्याकडे पाहून )अरे पण या बोलण्याच्या नादांत दिवस पहा किती वर आला तो! मला वाटतं गरूजी स्नान करून गेले असतील. तर चल, आपणही जाऊं तिकडे.

( असें ह्मणून दोघे जातात. )

( कंचुकी येतो. )

कंचुकी—सर्व लोकांची रीत अशी असते कीं—

अंजनी गीत.

तरुणपणीं ते धन मिळवीती ॥
वृद्धपणीं निजपुत्रांवरती ॥
ठेवुनि कुटुंबभर अनुभविती ॥
सुख विश्रांतीचें ॥ १ ॥

दिंडी.

परी आम्हां वार्धक्य जसें येतें ॥
तशी अमुची योग्यता अधिक होते ॥
नाहिं आशा यांतून सुटायाची ॥
दास्य करितां तनु अशि च झिजायाची ॥

तेव्हां आह्मांला आणि या अंत:पुरातल्या दास्यत्वालाधि॰
असो ! ( फिरून ) आमच्या राणीसाहेब कांहीं व्रत क॰
आहेत. त्याच्या संपूर्णतेला महाराजांनीं जवळ अ॰
अस आहे. ह्मणून राणीसाहेबांनीं मला आज्ञा केली ॰
कीं ' हें जरी मी निपुणिकेकडून महाराजांना कळवि॰रा
आहे, तरी तूं ही माझी विनंति त्यांना विदित कर. आ॰
महाराजांची स्नान संध्या आटपली असेल. तर आप॰
जाऊन बाईसाहेबांची विनंति कळवावी. ( जरा फिरू॰
अहाहा !

पद [ मुलतानी. त्रिताल ]

सायंकालीं नृपसदनाचा ॥ थाट खरा हा कं॰
अति मौजेचा ॥ धृ॰ ॥ निद्राकुल हे मयूर
बसती ॥ स्वस्थानीं जणु चित्रें दिसती ॥
जालांतुनि हे सुधूप निघती ॥ पारावत-

गण कीं हा वरचा ॥ १ ॥ अंत:पुरिच्या
वृद्धा दासी ॥ ठायिं ठायिं बलिगंधफुलां-
सी ॥ अर्पुनि मग मंगल दीपांसी ॥ ठेविति
तेथें, क्रम हा त्यांचा ॥ २ ॥

(पडद्याकडे पाहून) सरकारची स्वारी तर इकडेच आली.

पद. (रामराय राज्याचा॰)

या दासींनीं हातीं धरिले असति दीप जे
त्यांनीं ॥ वेष्टित हे नृपनाथ शोभती कैसे
आगमनीं ॥ १ ॥ पुष्पगुच्छयुत कर्णिकार
तरु बाजूवरि डुलती ॥ सपक्ष ऐसा नग चि
येतसे होय मना भ्रांती ॥ २ ॥

तर आतां महाराजांची दृष्टि माझ्यावर पडेल अशा ठिकाणीं उभं रहावं.

(राजा व विदूषक येतात.)

राजा—(आपल्याशीं)

पद [मोको गडुवा भरन न दि देरे]

मज ताप मदन बहु देई ॥ मनिं चैन नसे ॥ धृ॰ ॥
कार्यामाजीं गुंतुनि जातां ॥ दिवस कसा तरि जाई॥१॥
परि रजनीं तीसरतां न सरे॥उलटी दीर्घ चि होई॥२॥
रंजन कैसें होय मनाचें ॥ मोठें संकट येई ॥ ३ ॥

कंचुकी—(जवळ जाऊन) महाराजांचा विजय असो! राणी-साहेबांची अशी विनंति आहे कीं, राजवाड्याच्या गच्ची-वरून चंद्राचं दर्शन चांगलं होईल. या करितां चंद्राचा

व रोहिणीचा योग आहे, तों पर्यंत महाराजांनीं ति
बसण्याची कृपा करावी.

राजा—ठीक आहे. मी तुझ्या इच्छेप्रमाणं करतों असं
णीला कळीव.

( आज्ञा ह्मणून कंचुकी जातो )

राजा—मित्रा, हा राणीचा उद्योग केवळ व्रतासाठींच असे
विदू०—मला वाटतं कीं, तूं तिच्या पायां पडलास, त्यां
तिनं तुझ्याकडे लक्ष दिलं नाहीं. परंतु त्याचा अ
तिला पश्चात्ताप झाला असेल; आणि आपल्या अपराध
परिमार्जन व्हाव ह्मणून तिनं व्रताच्या निमित्तानं हा उ
चालिवला असेल.

राजा—तुझा तर्क बरोबर आहे. कारण—

साकी.

मानी स्त्री जी लोटी पतिला, जरि तो पायां पडला
तिजला त्याच्या आर्जववचनें पश्चात्ताप हि घडला
तरि तो गुप्तपणें ॥ ठेवी मनिंच्या मनिं जाणें ॥ १ ॥

तर मित्रा मला प्रासादावर जाण्याचा मार्ग दाखीव.

विदू०—असं इकडून याव महाराज. गंगेच्या तरंगा प्रमा
शुद्ध स्फटिकमण्यांचा हा जिना आहे. यावरून प्रासादा
चढावं. ( दोघे वर चढतात ) प्रदोषकाळीं हें स्थान कि
रम्य दिसतं. अहाहा ! अंधकार जाऊन ही पूर्वदि
पहा कशी आरक्त दिसूं लागली ती ! यावरून अ
चंद्रोदय लवकरच होईलसा वाटतो.

राजा—खरच ! हो पहा मौज:—

पद ( भूप त्रिताल. )

वारी तिमिरासी ॥ स्वकरीं ॥उदयगिरींच्या
मागुनि तो शशि ॥ धृ०॥ सांवरिले कीं
कच ज्यावरचे ॥ वदन असें हें पूर्ववधूचें॥
आनंदवि या नयनांसी ॥ १ ॥

विदू०—अहा! मित्रा, हा चंद्र पहा कसा अर्ध्या मोदकासारखा दिसतो तो!

राजा—या खादाडाला तर खाण्याच्या पदार्थावांचून दुसरं कांहीं सुचत च नाहीं.
(हात जोडून) हे भगवन् निशानाथा.

पद (कानडा त्रिताल)

वंदन तुजला हें शशिराया ॥ शंकरचूडा-
भूषणकाया ॥ धृ० ॥ दर्शदिनीं सत्क्रिया
घडाया ॥ रविच्या बिंबीं तूं जासी ॥रात्री
तिमिरा विलया नेसी ॥ देसि सुधा सुर-
पितरां प्याया ॥ १ ॥

विदू०—मित्रा, माझ्या मुखानं तुझा पितामहच तुला आज्ञा करतो, अस समजून खालीं बैस एकदांचा. ह्मणजे मी हीं थोडा स्वस्थ बसेन ह्मणतों.

राजा—( खालीं बसून परिजनांस ) या चांदण्यांत दीपिकांचा कांहीं उपयोग नाहीं. तर तुह्मीं हीं विश्रांति घ्या जा.
( आज्ञा ह्मणून जातात )

राजा—( चंद्राकडे पाहून ) मित्रा, राणी यायला अजून दोन

घटका अवकाश आहे. तर तोंपर्यंत माझी अवस्था काय झाली आहे, हें मी तुला सांगतों.

विदू०—सांगायला नको, दिसतेंच आहे ती. आतां तिची ती प्रीति पाहूनच मनाला धीर दिला पाहिजे. दुसरा उपाय नाहीं.

राजा—मित्रा तूं ह्मणतोस तें खरं. परंतु माझ्या मनाला फार ताप होत आहे. कसा ह्मणशील, तर ऐक.

दिंडी.

ओघ नदिचा पाषाण मधें येतां ॥
बळावे तो प्रतिबंध त्यास होतां ॥
येति विघ्नें संगमीं तिच्या मजला ॥
जोर आला शतगुणें मन्मथाला ॥ १ ॥

विदू०—मित्रा तुझं शरीर इतकं म्लान झालं असूनही जेव्हां तूं इतका सुंदर दिसतोस, तेव्हां तुझा आणि त्या अप्सरेचा संगम लवकर होणार, यांत संशय नाहीं.

राजा—मित्रा तुझ्या भाषणाप्रमाणं माझाही दक्षिणबाहु स्फुरून सुचिन्ह दाखवूं लागला आहे. यावरून तुझं भाषण खरं होईलसं वाटतं.

विदू०—असं वाटलंच पाहिजे. या ब्राह्मणाच्या तोंडचीं अक्षरं कधींच खोटीं व्हायचीं नाहींत. समजलास !

( इतक्यांत विमानांत बसून उर्वशी व चित्रलेखा येतात. )

उर्वशी—( आपल्याकडे पाहून ) गडे, आज मी हा निळा शालू नेसलें आहे नि अंगावर दागिनेही फार घातले

नाहींत. तेव्हां हा माझा अभिसारिकेचा वेश मला कसा काय शोभतो, सांग पाहूं ?

चित्र०—सखे, कसा शोभतो हें सांगायाला माझ्या वाणीला शक्तिच नाहीं, काय करूं ! अस मात्र वाटत कीं, मी जर पुरूरवा असते, तर मोठी मौज झाली असती. पण काय !

उर्व०—गडे

पद [ हजारा मोरा कानका मोती ]

कामानें व्याकुळ झालें ॥ धृ० ॥ शक्ति
नसे मज पद उचलाया ॥ मनमोहन तो
कवण्या ठायां ॥ असेल तिकडे ने ही
काया ॥ मन माझें आधिंच गेलें ॥ १ ॥

चित्र०—अग, दुसर कैलासशिखरच, अशा या तुझ्या प्राणप्रियाच्या मंदिराजवळ आपण येऊन पोंचलों दिखील.

उर्व०—तर मग—

पद ( मानीनीं मनी नोडो )

तो कोठें भूप ज्यानें ॥ मन माझें चोरिलें॥
॥ धृ० ॥ ध्यान करोनी पाही त्याला ॥
काय करितसे तें वद मजला ॥ फार गडे
मी बावरलें ॥ १ ॥

चित्र०—( चिंतन करून मनाशीं ) आतां हिच्याशीं थोडा विनोद करावा. ( उघड ) सखे, मी ध्यान करून पाहिलं, तों मला बाई अस दिसल कीं, तो तुझा मनमोहन, आपल्या मनोराज्यांत प्राप्त झालेल्या प्रियेबरोबर आनंद करीत,एकांतीं बसला आहे. ( हें ऐकून उर्वशी खिन्न होते ) हा वेडे ! अग

अस वाईट तोंड का केलस ? ती प्रिया ह्मणजे तूंच वर का!

उर्व०–( सुस्कारा टाकून ) तूं पाहिजे तें ह्मण. पण माझ वेडं मन मेलं संशयांत पडलं आहे.

चित्र०–( पाहून ) अग हा पहा तो राजा. या प्रासादावर आपल्या मित्रासहवर्तमान बसला आहे. तर आपण त्याच्या जवळ जाऊं.

( दोघी विमानांतून उतरतात. )

राजा–मित्रा, जशी जशी रात्र वाढत जाते, तसतशी मला मदनाची पीडा अधिक होऊं लागली, काय करूं रे !

उर्व०–सखे, यांच्या बोलण्याचा अभिप्राय मला नीट समजला नाहीं, ह्मणून बाई मला भीति वाटते. तर हे दोघे काय गुजगोष्टी करतात, हें आपण आड उभ राहून ऐकूं; ह्मणजे मनांतली शंका दूर होईल.

चित्र०—बर तर.

विदू०—हं काढली तोड. या अमृतयुक्त चंद्रकिरणांच सेवन कर ह्मणजे झालं.

राजा–माझी पीडा या अशा उपचारांनीं नाहींशी व्हायची नाहीं. कारणः—

पद ( कांहीं दिसती हे मेघ नभींचे )

भरला कामज्वर माझ्या देहीं ॥ पीडा बहु देई ॥ ध्रु० ॥शय्या नवकुसुमांची आदरिली ॥ परि तापद झाली ॥ किरणें चंद्राचीं सेवन केलीं ॥ परि तापद झालीं ॥ अंगा शीतलशी उटि लाविपली ॥ परि तापद

झाली ॥ मणिमाला ही धारण केली ॥
तापद परि ती अधिक चि होई ॥ १॥

अंजनी गीत.

समूळ हा ज्वर हरावयाला ॥
शक्ति एक त्या सुररमणीला ॥
कथा तिची वा तच्छमनाला॥
करिल जरा कांहीं ॥ १ ॥

उर्व०—मना, मला सोडून इकडे आल्याचं सार्थक झालं.

विदू०—आहा ! तिच्या गप्पा मारूनच समाधान करून घ्या-यचीं युक्ति चांगली काढलीस ! कारण मला जेव्हां श्रीखंड किंवा साखरभात खायची वांछा होते, तेव्हां मी त्यांच्या गप्पाच मारून समाधान मानतों.

राजा–पण तुला ते पदार्थ मिळतात.

विदू०—मग तुला ही ती लवकर च मिळेल.

राजा–मित्रा, मला सुद्धां असच वाटतं.

चित्र०–अजून नाहींना तुझ्या मनाची खात्री झाली ! ऐकतर !

राजा—मित्रा—

साकी.

वेगानें रथ खालीं येतां, सुंदरिच्या बाहूला ॥
लागुनिया हा बाहु एकला, लोकीं कृतार्थ झाला ॥
उरली ही काया ॥ भूवरि भार होय वाया ॥ १ ॥

चित्र०—गडे, आतां कां वर उशीर करतेस ! हो पुढें.

उर्व०–( राजापुढें उभी राहून, पुनः परतून ) सखे, मी महा-

राजांच्या पुढें गेलें, तरी त्यांनीं माझ्याकडे कां वर पाहिलं नाहीं ?

चित्र०–( हंसून ) अग, अंगावरला तिरस्करणी मंत्राचा बुरखा काढल्याशिवाय गडवडीनं पुढें गेलीस, म्हणून असं झालं, समजलीस ?

(पडद्यांत. असं इकडून यावं बाईसाहेब. )

विदू०—(ऐकून) अरे गप रे गप ! राणी साहेब आल्या वाटतं.

राजा— तूं सुद्धां नीट संभाळून बैस.

उर्व०—गडे, आतां कसं करावं बर ?

चित्र०–सखे, अशी घाबरूं नकोस. तिरस्करणी मंत्राच्या योगानं तूं कांहीं तिच्या दृष्टि पडायची नाहींस. आणखी राणीच्या वेशावरून ती व्रतस्थ आहेसं दिसतं, तेव्हां ती ही इथें फार वेळ राहायची नाहीं.

( राणी पूजाद्रव्य घेतलेल्या दासीसह येते. )

राणी–( वर पाहून ) हा भगवान् चंद्रमा रोहिणी जवळ असल्यानं फार शोभतो, नाहींग ?

निपु०–खरंच आहे. महाराज दिखील बाईसाहेबांजवळ असले म्हणजे असेच शोभतात !

विदू०–( पाहून ) मित्रा, राणी साहेबांच्या मनांतून मला कांहीं वायन द्यायचं आहे म्हण, किंवा व्रताच्या मिषानं तु, ह्या अवज्ञेच्या दोषाचं परिमार्जन करायचं असाव म्हण, कांहीं म्हण; परंतु राणीसाहेबांची मुद्रा आज सुप्रसन्न दिसते.

राजा—ह्या दोन्ही गोष्टी संभवतात. पण तूं दुसऱ्यानं ह्मट-
लस तें खरं असावसं वाटतं. कारण—

पद ( तों तननन वाजवि वेणू )

हीं धवलवसन नेसोनी ॥ शिरिं दुर्वांकुर
खोवोनी ॥ बघ मंगलमात्राभरणीं ॥ व्रत-
मिष तें करुनी ॥ सोडुनि सर्वहि गर्व म-
नीचा ॥ मज सुखवाया ये चालोनी ॥
॥ मानी ॥ १ ॥

राणी—( पुढें होऊन ) महाराजांचा विजय असो.

निपु०—भटजीबुवा नमस्कार करतें.

विदू०—कल्याण.

राजा—यावं देवी! ( हात धरून तीस बसवितो. )

उर्व०—सखे, महाराजांनीं राणीला देवी ही उपमा अगदीं
योग्य दिली. कारण, ही रूपानं किंवा तेजानं इंद्रायणी
पेक्षां कांहीं कमी नाहीं.

चित्र०—शाबास ! निष्कपटपणा ह्मणतात तो हा.

राणी—महाराज !

पद ( सुखवि नयन किति )

जोडुनि कर ही दासी विनवी ॥ इच्छा
माझी पूर्ण करावी ॥ १ ॥ व्रत मी कांहीं
करितें त्यासी ॥ भार्या पतिच्या जवळ अ-
सावी ॥ २ ॥ ऐसें आहे, म्हणुनी क्षणभरि॥
अवलक्षण माझी ही सोसावी ॥ ३ ॥

राजा—छे छे ! प्रिये हें काय ! हा तर मला मोठा लाभच झाला. याला अडचण कोण ह्मणेल वर ?

विदू०—माझ्या सारख्या शांतिरस्तु पुष्टिरस्तु करणाऱ्या ब्राह्मणाला वायनाच्या अशाच अडचणी येवोत !

राजा—वर पण प्रिये, या व्रताचं नांव काय ?

निपु०—(राणीच्या खुणेवरून) महाराज या व्रताचं नांव प्रियानुप्रसादन व्रत.

राजा—प्रिये !

पद. [ मालकंस. त्रिताल. ]

कोमल ही काया ॥ व्रतनियमाचे कष्ट
सोसुनी, सुकविसि कांगे वाया ॥ धृ० ॥
प्रसाद व्हावा या आशेनें ॥ लीन असे
जो या पायां ॥ त्या तव दासा प्रार्थुनि
इच्छिसि, सांग काय मिळवाया ॥ १ ॥

उर्व०—महाराज हिला मोठाच मान देतात !

चित्र०—अग, मान कसला ! वेडीच आहेस तूं ! दुसऱ्या स्त्रीवर मन बसलं, ह्मणजे धूर्त लोक असच गोडगोड बोलून आपल्या नायकांना फशिवतात, समजलीस ?

राणी—या व्रताचा काय गुण असेल तो असो; आज महाराजांशीं इतक तरी बोलायला मिळालं.पण माझी विनंति-

विदू०—आतां मुकाट्यान राणीसाहेबांच्या विनंतीला मान दे.

राणी—अग, माझ पूजापात्र आण इकडे. मी या इथे पडलेल्या चंद्रकिरणांची पूजा करतें.

निपु०—हें पूजापात्र बाईसाहेब. गंध, फूल, सर्व आहे यांत.

राणी—( पूजा करून ) निपुणिके, हें मोदकांचं वायन भट-जींनां दे.

निपु०—आज्ञा बाईसाहेब. भटजीबुवा हें घ्या वायन.

विदू०—( घेऊन ) स्वस्त्यस्तु ! इच्छितफलप्राप्तिरस्तु ! व्रतसा-फल्यंभवतु !

राणी—( राजास ) अंमळ इकडे यायचं होतं.

राजा—हा मी जवळच आहे.

राणी—( राजास पूजा व नमस्कार करून ) महाराज,

पद

करुनि साक्ष रोहिणिसह या निशाकरा ॥
प्रार्थितसे विनयानें आज नृपवरा ॥ धृ० ॥
आपण ज्या सुंदरिचा छंद घेतला ॥ ध्यास
आपुला हि जिला फार लागला ॥ तिजसह
सुख सेवाया ॥ भीति न च धरा ॥ १ ॥

उर्व०—चांगलं झालं बाई ! आतां ही पुढें कांहीं कां ह्मणेना, पण माझ्या मनाला धीर आला.

चित्र०—ही मोठी पतिव्रता आहे. हिची आज्ञा मिळाल्यावर तुला आतां कसलीच भीति उरली नाहीं.

विदू०—( मनांत ) थोट्या कोळयाच्या हातांतून धरलेला मासा निसटून गेला ह्मणजे तो ह्मणतो, जा, तुला जीवदान दिलं. त्या प्रमाणं मला हा प्रकार दिसतो. ( उघड ) कां बाईसाहेब ! अशीच कां महाराजावर आपली प्रीति आहे ?

राणी—मला सुख नसलं तरी चालेल; परंतु महाराजांना सुख मिळावं अशी माझी इच्छा आहे. यावरून मुर्खा तुला नाहीं कां समजत प्रीति कशी आहे ती ?

राजा—प्रिये—

पद [ गुल चमनमे बीचू० ]

अधिकार तुला मज अन्याला द्यायाचा ॥
त्यापासुनि अथवा हरण करुनि घ्यायाचा॥
संदेह तुला जो आला या दासाचा ॥ तो
सर्व हि मिथ्या, त्याग करी त्याचा॥ १ ॥

राणी—तें कांहीं कां असेना. माझ्या मनांतून प्रियानुप्रसादनव्रत करायचं होतं, तें मी यथासांग केलं. चल ग आतां आपण जाऊं.

राजा—प्रिये, मला सोडून चाललीस, पण प्रसन्न नाहीं केलस ?

राणी—आणखी काय प्रसन्न करायचं ? मी नाहीं आपल्या व्रताचा नियम कधीं मोडायची. ( दासीसह जाते )

उर्व०—सखे—

पद ( एक क्षणभरि० )

देवी वरती या नृपतीची ॥
प्रीति मला गे दिसते साची ॥
परि मन्मानस परतायाची ॥
आशा नाहीं मजला बाई ॥ १ ॥

चित्र०—गडे, पण तूं इतकी निराश कां होतेस ?

राजा—( आसनावर येऊन) राणी दूर गेली कां पहा बर मित्रा,

विदू०–( पाहून ) अरे रोगी गचावतो असं वैद्यबुवांना वाटलं. ह्मणजे ते जसे त्याला सोडून जातात, तशी ती आपल्या ग सोडून चालती झाली. आतां काय बोलायचं असेल तें खुशाल बोल.

राजा–मित्रा उर्वशी असं करील कांरे !

पद [ सांज समे घर० ]

सांग मधुर नूपुररव कानीं॥ गजगमना
ती पाडिल कां॥धृ०॥लपुनि छपुनि ती ये-
उनि मागें ॥नेत्र करांनीं झांकिल कां॥ १॥
सोडुनि अंबर या प्रासादीं ॥ सुंदरि उ-
तरुनि येईल कां ॥ २ ॥ भीतिमुळें गति
मंद बघोनी ॥ चतुर सखी तिस लोटिल
कां ॥ ३॥ त्या भीरूला सन्निध माझ्या ॥
समजाउनि ती आणिल कां ॥ ४ ॥

उर्व०–सखे, तर मी असच करून त्यांचे मनोरथ पूर्ण करतें. (राजाच्या मागून येऊन त्याचे डोळे झांकते. चित्रलेखा विदूषकास गप्प बसण्याची खूण करते.)

राजा–( हातास स्पर्श करीत ) मित्रा, नारायणमुनींच्या उरू-पासून उत्पन्न झालेली तीच ही सुंदरी ! खास खास तीच !

विदू०–हें तुलारे कसं कळल ?

राजा–कसं ह्मणून काय विचारतोस ? अरे हें पहा:–

दिंडो.

मदनपीडित तनुस या सौख्य देई ॥
अशी दुसरी कामिनी कोणि नाहीं ॥
विकासेना रविकरें कुमुदिनी ती ॥
परि तिजला शशिकरंचि विकसवी ती ॥१॥

उर्व०–( हात काढून ) महाराजांचा विजय असो.

राजा–अहाहा ! प्रिये उर्वशी बैस. ( आसनावर वसवितो. )

चित्र०–आतां मला पाहून महाराजांना आनंद होतो कां ?

राजा—हें काय विचारतेस ? झालाच पाहिजे.

उर्व०—अग, राणीसाहेबांनीं महाराज माझ्या स्वाधीन केले आहेत, ह्मणून मी तिच्यावर प्रेम ठेवून यांच्या अंगाला स्पर्श केला. माझ्यांत मत्सरभाव इतका दिखील नाहीं, समजलीस ?

विदू०–( आपल्याशीं ) राणीन महाराज स्वाधीन केले ! ह्मणजे ? अस्तमानापासून या इथेच आहेत कीं काय !

राजा–प्रिये—

पद [ निर्मल कुल कसलें ]

देवीनें दिधला ॥ ह्मणुनि तूं आलिंगिसि
मजला ॥ धृ० ॥ परि ज्या समयीं या हृद-
याते ॥ हरिलें तेव्हां वद कवणाते ॥ सुंदरि
अनुमत पुशिलें होतें ॥ आतां कां वळला॥
त्वन्मुखशशि हा बाजूला ॥ १ ॥

चित्र०–महाराज, या प्रश्नाचं तिनं काय उत्तर द्यावं बर !

आतां आपण माझ्या विनंतीकडे लक्ष द्यावं.

राजा–बोल. माझं लक्ष आहे.

चित्र०–हा वसंत ऋतु संपल्यावर मला सूर्य नारायणाच्या सेवेला गेलं पाहिजे. तेव्हां या माझ्या प्रियसखीला स्वर्गाची आठवण होणार नाहीं, अशी वागवावी एवढीच विनंति आहे.

विदू०–अहा! स्वर्ग! स्वर्ग! काय डौल स्वर्गाचा! मी तुला विचारतों, आठवण होण्यासारखं असें काय विशेष आहे स्वर्गांत! ना खायला, ना प्यायला! माशा सारखं एकमेकाकडे नुसतं पाहायचं, हेंच कीं नाहीं!

राजा–चित्रलेखे–

साकी.

स्वर्गाचें सुख अनुपम असतें ॥ कोण विसरविल त्यानें॥
परि समजे हा होय पुरूरव ॥ दासाधिक तव सखिते॥
जो अन्यस्त्रीला ॥ आजवरीं नच वश झाला ॥ १ ॥,

चित्र०–हा महाराजांचा माझ्यावर उपकारच झाला. सखे आतां मला निरोप दे. अगदीं भिऊं नकोस.

उर्व०–(तिला आलिंगून) गडे, मला विसरायची नाहींस ना!

चित्र०–अग, महाराजांच्या समागम सुखांत तूंच मला विसरूं नकोस म्हणजे झालं. येतें हं (राजास नमस्कार करून जाते.)

विदू०–तुमचे दोघांचेही हेतु पूर्ण झाले. आतां उत्तरोत्तर आनंदाची वृद्धि होवो म्हणजे झालं.

राजा–

पद [ कवणें तुज गांजियलें ]

झालों मी आज धन्य धन्य भूवरीं ॥
सुखकर पददास्य हिचें लाभतां करीं ॥ धृ० ॥
आज्ञा मम सकल भूप धरिति मस्तकीं ॥
पृथ्वीचें सार्वभौम राज्य हस्तकीं ॥
यांतहि मज धन्यत्व न वाटलें तरी ॥ १ ॥

उर्व०–आतां यापुढें मी काय बोलावं !

राजा–(उर्वशीचा हात धरून) अहाहा ! काय चमत्कार आहे !

पद [ सोडोनीया सुकुसुम शयना ]

पूर्वीचें हे कर चंद्राचे ॥ आतां होती
शीतल साचे ॥ तैसे शर ही त्या मदनाचे॥
देती सुख कीं माझ्या हृदया ॥ १ ॥ पूर्वीं
जें जें अप्रिय होतें ॥ आतां झालें तें आ-
वडतें ॥ ऐसें व्हाया कारण कांते ॥ झाला
संगम आज तुझा गे ॥ २ ॥

उर्व०—मी लवकर न आल्यानं महाराजांना फार त्रास झाला,
तर त्याची मला क्षमा——

राजा–छे छे ! भलतच. हें पहा–

साकी.

भोगुनि दुःखा सुख मिळतें जें अधिक गोड लागे तें॥
प्रखर रवीच्या संतापानें त्रस्त अशा पांथाने ॥
छाया वृक्षाची ॥ वाटे फारचि सौख्याची ॥ १ ॥

विदू०—महाराज, या प्रदोष काळच्या रमणीय चंद्रकिरणांच आपण सुख घेतलत. तर आतां मंदिरांत चलाव.

राजा—चल तर. तुझ्या वहिनीला वाट दाखांव.

विदू०—ठीक आहे. असं या वाटेनं यायच.

राजा—आतां इच्छा इतकीच आहे,—

सर्व०—ती काय ?

राजा—हींच कीं,

पद. [ फूलवाले कंथ मैको ]

आजवरीं जैसी मजला शतपट रजनी भासली गे ॥ धृ० ॥ तुझिया सुखकर संगीं आतां ॥ पूर्वीपरि ती सुदीर्घ होतां ॥ सुंदरि तनुची या सार्थकता ॥ मानिन झाली चांगली ॥ १ ॥

सर्व जातात.

अंक ३ रा समाप्त.

# अंक ४ था.

( सहजन्या व चित्रलेखा येतात. )

सहजन्या—गडे, सुकलेल्या कमळाप्रमाणं आज तुझं तोंड दिसतं. यावरून मला वाटतं तुझ्या मनाला कांहीं तरी काळजी लागली आहे. असं असेल तर काळजीचं कारण सांग, म्हणजे मी ही तुझी वाटेकरीण होईन.

चित्र०—सखे, सूर्याची सेवा आप्सरांनीं पाळीपाळीनं करा-यची. या नियमा प्रमाणं मी सेवेंत आहेच. पण माझी मैत्रिण उर्वशी जवळ नाहीं, म्हणून मला फार वाईट वाटतं.

सह०—तुमची दोघींची मैत्रीच तशी आहे.

चित्र०—सखे, या दिवसांत तिचं कसं काय चाललं आहे हें कळावं म्हणून मी सहज ध्यान करून पाहिलं, तों मला बाई कांहीं भयंकरच दिसलं

सह०—असं काय बाई तें?

चित्र०—सखे, त्या राजर्षीकडून सर्व राज्यकारभार प्रधा-नावर सोंपवून माझी उर्वशी त्यालाघेऊन गंधमादन पर्वतावर विहार करण्यासाठीं गेली.

सह०—खरच गडे! अशा रम्यप्रदेशांत जाऊन विहार करणं, यालाच विलास म्हणायच. बर मग?

चित्र०—तिथे विद्याधराची कन्या उदयवती, ही मंदाकिनी नदीच्या काठीं वाळूचे पर्वत करून खेळत होती. ति-च्यावर राजाचं मन गेलं, असं पाहून उर्वशीला राग भाला बाई.

सह०—गडे, यायचाच. जिथे प्रीति फार तिथे हें कुठून सहन व्हायला. वर मग ?

विन्न०—मग त्या राजान तिची पुष्कळ समजूत केली, पुष्कळ आर्जव केले, पण तिनं कांहीं बाई तें ऐकल नाहीं, आणखी कुमारवनांत स्त्रियांनीं जायाच नाहीं, या गोष्टीच, गुरुजींच्या शापानं, तिला विस्मरण पडल, आणि ती त्या वनांत गेली. मग काय? षडाननाच्या शापानं लता होऊन राहिली.

सह०—दैवाच्या पुढं कोणाच्यान जाववत नाहीं बाई. तशा प्रीतीचा हा असा परिणाम व्हावाना देवा ! वर मग त्या राजाची तरी बिचाऱ्याची पुढं काय स्थिति झाली बर ?

चित्र—तो वेडा होऊन उर्वशी! उर्वशी! करीत त्या वनांतच इकडे तिकडे अहोरात्र फिरतो आहे. तशांतून मनाला अधिकच चेतवायला हा मेला मेघकाळ सुरू झाला. आतां तर त्या बापड्याचे फारच हाल होतील.

सह—गडे, अशा थोर पुरुषावर कसा जरी प्रसंग आला, तरी तो फारवेळ रहात नाहीं असा नेम आहे. ह्मणून तुला सांगतें कीं कुणाच्या तरी प्रसादान त्याचा आणि तिचा पुनः खास संगम होईल. पण हे पहा भगवान् सूर्यनारायण उदयास आले. चल त्यांची पुजा करूं.

( दोघी जातात. )

( उन्मत वेशानें राजा येतो. )

ना—हा दुष्टा राक्षसा! उभा रहा. माझ्या प्रियसखीला

घेऊन कुठं चाललास ? अरे हा पर्वत शिखरावरून आ-
काशांत जाऊन माझ्यावर शरवर्षाव करूं लागला;
( पाहून ) छे छे !

पद [ नोहे हा पवन जवन ]

नोहे हा असुराधम घनचि फिरतसे ॥ चाप
न हें वाकविलें इंद्रधनु असें ॥ धृ० ॥ बाण न
हे मजवरती ॥ जलधारा तीव्र सुटति ॥ निक-
षावरि कनकदीप्ति ॥ तेवि रम्य चपला ती ॥
सुंदरिची गौर कांति खचित ती नसे ॥ १ ॥

तर मग ती कुठं गेली असावी वर ? कदाचित् माझ्यावर
रागावून आपल्या प्रभावानं गुप्त झाली ह्मणाव, तर ती
इतकी दीर्घ कोपी नाहीं. पुनः इंद्रलोकीं गेली ह्मणाव तर
तिच सर्व मन माझ्यावर आहे. वर दुष्ट राक्षसांनीं नेली
म्हणाव तर तेही संभवत नाहीं. कारण—

दिंडी.

जवळि असतां भूप हा सुंदरीला ॥
न्यावयाचें बल नसे राक्षसांला ॥
तरी कोठें ती मला दिसत नाहीं ॥
दैव माझें प्रतिकूल कसें पाही ॥ १ ॥

( चोहीकडे पाहून दुःखानें श्वास सोडून ) हरहर !

साकी.

दुःखा मागुनि दुःखचि येतें, फिरतां काळ नराचा ॥
विरह सखीचा दुःसह असतां ऋतु ये नवमेघाचा ॥
दिन हे रम्य असे ॥ परि तिजवांचुनि चित्त झुरे ॥ १ ॥

' राजा कालस्य कारणम् ' असं मुनींच वचन असून मी व्यर्थ आपल्या मनाला क्लेश देत आहे. तर या मेघकाळाच निवारणच केल पाहिजे. पण नको, असं करूं नये. कारण यानं मला ही राजभोगाची सामग्री कशी सादर केली आहे पहा—

पद [ निर्धनतेनें लज्जा निपजे ]

कांचनरेखसम ही झळके वीज सघनथं-
बरीं ॥ माझें छत्र निळें भर्जरी ॥धृ०॥वेतस
तरुचे तुरे हालती वायूनें वरिवरी ॥ ढा-
ळिति चौऱ्या जणु मजवरी ॥ चाल ॥
ऋतु निदाघ सरतां मोर मधुर बोलती ॥
ते मजला माझे बंदीजन वाटती ॥ हे पर्वत
सारे सौदागर बैसती ॥ धारारूपी हार
घालिती या कंठीं निजकरीं ॥ भोगी राज-
भोग या परी ॥ १ ॥

पण या श्लाघेपासून माझी प्रिया कुठं गेली, हें मला कसं कळणार ! तर तिचाच शोध करावा. ( पाहून ) आहा ! ही मला खूण सांपडली.

पद [ यादव रया भाईयारे ]

जलबिंदूनीं भरलेलीं हीं लाल फुलें दिसतीं॥
सखिचे कोपें लाल सजल ते नेत्र मला
स्मरती॥ चाल ॥या काननभागीं सिकता
भिजली दिसे ॥ या मार्गें गेली मानूं जरि
मी असें ॥ उठल्या असत्या नितंबभारें ॥

लाल चरणपंक्ती ॥ परि चिन्हें तीं दिसतिं
न कोठें या भागावरती ॥ १ ॥

( पुढें पाहून हर्षानें ) आहा ! ही मात्र चांगली खूण सापडली. इच्यावरून ती कुणीकडे गेली, याचं अनुमान करतां येईल.

पद [ चाल मागील ]

ती त्वरित गतीनें जातां रागाउनी ॥
नयनाश्रु भिजविती अधरपुटां, तेथुनी॥रंग
तयांचा घेउनि ते स्तनवसनावरि गळती ॥.
दिसे वसन तें शुकोदरापरि घ्यावें तरि
हातीं ॥ १ ॥

हर हर ! हें तर कोवळं गवत ! आणि याच्यावर हे इंद्रगोपकीटक बसले आहेत. व्यर्थ फसलों ! ( इकडे तिकडे पहात ) या निर्जनवनांत माझ्या प्रियसखीचा शोध कुठून लागणार ! बर, हा मोर पर्वतशिखरावर बसून, उंच मान करून मेघाकडे पहात आहे, याला विचारावं. हे नीलकंठा ! माझी मृगनयना प्रिया या वनांत कुठं तुझ्या दृष्टीं पडली कां रे ? अरे हा तर प्रश्नाचं उत्तर न देतां आनंदानं नाचूं लागला! समजलों याच्या आनंदाचं कारण काय तें.

पद [ निपजे नारायण रविवंशी ]

सुंदर काळा कलाप याचा मंदवायुनें हा
हाले ॥ कांता जातां प्रतिपक्षाला कोणि
न याच्या उरलें ॥ विगलित झाली ही

रतिकालीं वेणी सखिची जींत फुलें ॥
तत्कीर बघतां जरि तरि करितां काय
शिखी हा नकळे ॥ परि तें सर्वांचि कीं
फसलें ॥ ह्मणुनि स्फुरण यास आलें ॥ १ ॥

तर दुसऱ्याचं दुःख पाहून आनंदानं नाचणारा हा, याला विचारून कांहीं फळ नाहीं. ( दुसरीकडे पाहून ) हां ! ही कोकिला ग्रीष्मकाळ सरत आल्यामुळें अधिक उन्मत्त होऊन या जांबळीच्या झाडावर बसली आहे. सर्व पक्षांत हिची जात शहाणी असं ह्मणतात. तर हिची प्रार्थना करूं.

पद ( वाङ्घडिला )

स्मरदूती तुज म्हणती कामी ॥ बहु चतुरा
तूं ऐशा कामीं ॥ १ ॥ मानी स्त्रीचा मान
हराया ॥ तुजविण दुसरें साधन वाया ॥
॥ २ ॥ जाउनि येथें आण सखीसी ॥ अ-
थवा मजला ने तिजपाशीं ॥ ३ ॥

( ऐकलेंसें करून ) काय ह्मणतेस ? तिची तुझ्यावर इतकी प्रीति असतां ती तुला कशी सोडून गेली ! ऐकः——

साकी.

प्रीति असोनी कोपे ती परि कारण मज अठवेना ॥
सत्ता स्त्रीची पतिवरि मोठी, त्याचा दोष नसेना ॥
सोडुनि रागानें ॥—

काय ! ही माझ्या बोलण्याकडे दुर्लक्ष्य करून आपल्याच नादांत निमग्न झाली ! हर हर ! “ परदुःख शीतल ” ही

ह्मण सर्वथैव खरी आहे. कारण माझ्या विनवणीचा अना-
दर करून,

दिंडी-

अधरमधुचा स्वाद कीं घ्यावयाला ॥
अर्धपक्वा या जंबुच्या फळाला ॥
धरी वदनीं मदमत्त कोकिला ही ॥
कीव माझी कांहींच येत नाहीं ॥ १ ॥

असो. हिचा स्वर माझ्या प्रियेच्या स्वरासारखा मंजुळ आहे, ह्मणून हिच्यावर कोप करीत नाहीं. आपणच इथून दुसरीकडे जावं झालं.(फिरतां फिरतां ऐकलेसें करून)अरे! या दक्षिणेकडून नूपुरांचा शद्ब ऐकूं येतो. माझी प्रिया चालली आहे वाटतं. जावं तर—( पाहून ) अरे अरे ! पुनः फसलों. मेघांनीं सर्व दिशा कृष्णवर्ण झाल्या असं पाहून, हे हंस मानससरोवराकडे निघाले आहेत, त्यांचा शब्द हा! असो. हे उडून गेले नाहींत तों पर्यंत यांच्या पैकीं कुणाला तरी विचारून पहावं.

पद ( गुणगंभिरा नूं गुणिरे )

सांगुनी सुखकर वार्ता सखिची दुःखि-
तासी ॥ हंसवरा जाई मग तूं आपुल्या
स्थलासी ॥ तोंवरी पंकजनाल मुखीचें
ठेवि खालीं ॥ थोर दया स्वार्थाहुनि वा
वाटते सतांसी ॥ १ ॥

अरे हा जाण्याच्या गडबडींत मी तिला पाहिली नाहीं असं ह्मणतो. ( हंसास ) पाहिली नाहीं ह्मणतोस, तर मग

चोरा! तिची विलासगति तुला कुठून मिळाली! हें पहा, आतां मुकाट्यानं माझी कांता मला परत दे. नाहींतर— ( हंसून ) चोराला दंड करणारा हा राजा आहे, असं समजून हा बेटा उडून गेला! असो हा चक्रवाक् पक्षी आपल्या प्रियेजवळ बसला आहे; याला विचारावं. चक्रवाका, माझी प्रिया कुठें पाहिलीस ? हा तर कः कः असं विचारतो! यावरून मी कोण तें याला ठाऊक नाहीं वाटतं. चक्रवाका ऐकः—

अंजली गीत.

माझा मातामह तो सविता ॥
जनकहि तैसा शशि मत्ताता ॥
धरा उर्वशी दोघी कांता ॥
त्यांनीं मज वरिलें ॥ १ ॥

अरे हातर स्वस्थ बसला! बर. याची थोडी निंदा केली पाहिजे. चक्रवाका—

पद ( रामराय राज्याचा )

तुम्हां उभयतांमध्यें येतां, आड पान कमलाचें ॥ स्त्रीसाठीं तूं तळमळ करिसी, स्मरण न कां त्याचें ॥ १ ॥ स्नेहें सखिच्या धैर्य तुझें बा, जाय गळुनि साचें ॥ जाणुनि हें कां वृत्त न वदसी, मजला कांतिचें ॥ २ ॥

खरोखर माझं दैवच फिरलं ह्मणून हें असं होतं. तर दुसरीकडेच जावं ( काहीं पाउलें जाऊन ) अहाहा!

साकी.

भ्रमर करी गुंजारव ज्यांताने कमल असें हें दिसतें ॥
त्या वदना सम, अधर चावतां करि जें सीत्काराते ॥
याते पाहोनी ॥ जाउं कसा मी येथोनी ॥ १ ॥

या कमळांतल्या भ्रमराला तरी विचारावं. नाहींतर तेवढी च खुरखुर राहील. हे मधुकरा त्या माझ्या मदिरलोचनेची कांहीं वार्ता सांग. ( विचार करून ) छे ! पण ती याच्या दृष्टीच पडली नाहीं. तसं असतं तर तिच्या मुखकमला-चा सुवास सोडून या कमलाकडे हा कां आला असता ? जावंच झालं इथून. ( कांहीं चालून ) अरे हा गजराज झाडाच्या फांदीवर सोंड टाकून आपल्या स्त्रीसह इथें उभा आहे. याला आपल्या प्रियेची माहिती विचारावी. ( हत्तीकडे पाहून ) परंतु घाई करून उपयोग नाहीं. कारण,

पद ( मम जिवाची )

नव पल्लव दे आणोनी ॥ आसवगंधरसाचा
खासा स्वकरें मोडुनि तत्प्रिय करिणी ॥ धृ० ॥
खावो तरि हा आनंदानें ॥
वृत्त पुशिन मग या लागोनी ॥ १ ॥

(कांहीं वेळ उभा राहून ) याच खाणं झालं. आतां जवळ जाऊन त्याला मी विचारतों. हे गज श्रेष्ठा माझी प्रिया तुझ्या नजरेस पडली ? तुला मी तिच्या खुणा सांगतो. तिची वाणी मधुर आहे. यूथिकापुष्पाप्रमाणें तिचे केश काळे आहेत. तरुणी असून सुंदर आहे.

( आनंदानें ) प्रियेचा वृत्तांत माहीत आहे, असं सुचविणा-

त्या याच्या गंभीर गर्जनेनं मला धीर आला. हे गजराजा, तुझ्या माझ्यांत साम्य असल्यानं तूं मला फार आवडतोस. साम्य कसं ह्मणशील, तर पहाः—

पद ( जो जिंकुनि )

अधिनायक नृपतींचा मी ॥ तूं ही असशि
गजांचा स्वामी ॥ धृ० ॥ बहु दान सो-
डिसी नेहमीं ॥ तुष्ट करितों मी धनका-
मीं ॥ १ ॥ तव भार्या करिणीमाजीं ॥
तैसी नारींत सुंदर माझी ॥ २ ॥ हें सर्व तुळे
जरि नामी ॥ तुज विरह नसो स्त्रीकामी ॥ ३ ॥

गजराजा, सुखी ऐस! मी जातों. ( थोडेसें वळून )—अरे हा सुरभिकंदर नांवाचा रमणीय पर्वत अप्सरांचा फार आवडता आहे. तर माझी प्रिया कदाचित् इथें असल्यास पहावी. पण हा अंधःकार पडला, आतां कसं करावं! असो. या विजेच्या उजेडानं पाहूं. हर! हर! काय पहा दुर्दैवाचा सपाटा! विजेचा प्रकाश होता तोही एकाएकीं नाहींसा झाला. इतकं झालं तरी या पर्वतावर जाऊन तिचा शोध केल्याशिवाय माघारा नाहींच फिरणार. ( पर्वतास विचारतो. ) हे गिरिराजा रतिप्रमाणं सुंदर अशी माझी कांता तूं कुठें पाहिलीस कां? हा उत्तर कां वर देत नाहीं! समजलों. मी दूर असल्यानं माझा प्रश्नच यानं ऐकला नाहीं. तर जवळ जाऊन विचारावं.

( जवळ जाऊन )

साकी.

सर्वांगें तीं कोमल सुंदर जीची ऐसी कांता ॥
रम्यवनीं या एकलि फिरतां पाहिलि भूधरनाथा ॥१॥

( ऐकून ) काय ! पाहिली ह्मणतां ? शाबास ! तर तुह्मांला या पेक्षांहि अधिक गोड वार्ता ऐकायला मिळेल. कुठें आहे तर माझी प्रिया ? ( प्रतिध्वनि ऐकून ) शिव शिव ! हा माझ्याच शद्बांचा प्रतिध्वनि ( खालीं पडतो ) हाय ! हाय ! फारच थकलों. या नदीच्या काठीं तरी जाऊन बसावं; ह्मणजे तिच्या तरंगावरून येणाऱ्या गार वाऱ्यानं जरा बर वाटेल. ( तसें करून ) ही नवीन पाण्यानं गढूळ झालेली नदी पाहून, मला असं वाटतं कीं—

पद [ केळीस अशी ]

धरुनि रूप सरितेचें तीच जातसे ॥ माझा
अपराध गणुनि दोष देतसे ॥ धृ० ॥
भ्रूभंगासम तरंग दिसति हे मला ॥
पक्ष्यांची पंक्ति गमे कटिस मेखला ॥
धवल फेन हाचि शुभ्र शालु नेशिला ॥
गळतां तो गडबडिनें सावरीतसे ॥ १ ॥

तर हिची प्रार्थना केली पाहिजे. ( हात जोडून ) प्रिये, माझ्यावर कां इतका राग वर ?

पद [ त्या मदन मनोरम रूपीं ]

तुजवरी प्रेम बहु केलें ॥ बोलोनि मधुर
सुखवीलें ॥ तव वचन कधिन भंगीलें ॥ वां-
कडे मनीं नच आलें ॥ चाल ॥ अपराध

काय मग बहुला ॥ तो प्रिये तुज न
आवडला ॥ म्हणुनि या दीन दासाला ॥
विरहिं लोटिलें ॥ वद तुला कसें हें
रुचलें ॥ १ ॥

बोल. बोल. कां वर बोलत नाहीं ही ! अथवा ही खरीच नदी ! उर्वशी असती तर मला सोडून समुद्राला भेटायला कधीं गेली नसती. असो. आपण आतां खिन्न न होतां उत्साह धरावा. कारण उत्साहानं कल्याण होतं. असं म्हणतात. जावं तर, माझी प्रिया ज्या प्रदेशांत नाहींशी झाली तिकडेच जावं. ( कांहीं चालून ) इथें हा हरिण बसला आहे, याला पाहून.

अंजनी गीत.

वनशोभा ही पहावयाला ॥
कानन लक्ष्मी सोडी याला ॥
काय तियेचा कटाक्ष काळा ॥
ऐसें मज वाटे ॥ १ ॥

( पाहून ) अरे ! हा माझी अवज्ञा करायलाच तोंड फिरवून बसला वाटतं. छे, छे !

अंजनी गीत.

येतां इकडे हरिणी, तिजसी ॥
बालक झोंबे स्तन प्यायासी ॥
वळुनि तिजवरी दृष्टी ऐसी ॥
लावी एकाग्रें ॥ १ ॥

हे हरिणा, तुझ्या प्रिये प्रमाणच दीर्घ लोचना, अशी माझी

प्रिया या वनांत तूं कुठें पाहिलीस कां ? तो प्रियेकडेच पहातो आहे, माझ्या बोलण्याकडे लक्षच नाहीं. बरोबर आहे. ज्याचं दैव फिरलं. त्याचा असा अपमान व्हायचाच, दुसरीकडे जाव. ( कांहीं चालून ) तिच्या मार्गाची खूण सांपडली ! हाच तो रक्तकदंब. याचच शेवटच्या भराचं अर्धं उमललेलं पुष्प प्रियेनं त्या दिवशीं वेणींत घातलं. ( एकदम पाहून ) अरे! या दगडाच्या कपारींत तांबडं काय बर चकाकतं आहे. सिंहान मारलेल्या हत्तीच मांसखंड नव्हे, निखारा ही नव्हे, कारण नुकतीच या वनांत सर्वत्र वृष्टि झाली आहे. हां ! समजलों, तांबड्या अशोकाच्या पुष्पगुच्छाप्रमाणं हा मणी आहे, व तो घ्यायला सूर्यान आपला हात सरसावलेला दिसतो. आपणच घ्यावा तर— ( थांबून ) पण काय करायचा घेऊन ?

साकी.

त्या सुंदरिच्या वेणीमाजीं मंदाराच्या कुसुमीं ॥
शोभा देतां, परि दुर्लभ ती झाली मग याला मी ॥
घेउनि अश्रूनीं ॥ टाकुं कशाला मळवोनी ॥ १ ॥

( मागें फिरतो. इतक्यांत पडद्यांत ) घे घे वत्सा.

ओवी.

गिरिजाचरणरक्तिमेपासोनी ॥
झाला जो हा संगमनीय मणी ॥
धारण करील त्या लागोनी ॥
प्रियजन भेटे सत्वरी ॥ १ ॥

राजा—हा कुणाचा बर उपदेश ? ( पाहून ) या मृगसंचारी

मुनिमहाराजांची हीं कृपा वाटतं. भगवन्! हा माझ्यावर आपला प्रसादच झाला. (मणी घेऊन) हे संगमनीय मणे!

पद [ कान्होबा संभाळरे ]

जरि त्या सुंदरिची ॥ तव संगें ॥ होइल
भेटी मजला ॥ १ ॥ तरि मी वाहिन रे ॥
भूषणसा ॥ मस्तकिं माझ्या तुजला ॥ २ ॥
जैसा शंकर तो ॥ शिरिं धरितो ॥ द्विति-
येच्या चंद्राला ॥ ३ ॥

(इकडे तिकडे फिरून) ही लता पुष्परहित असतां हिच्या-वर माझं मन कां वर वेधलं? अथवा ठीकच आहे. कारण—

पद [ धनहीन असा होय सखे ]

चरणीं मी लीन तरी दूर सारुनी॥ आली
या काननिं ती प्राणमोहिनी ॥ धृ० ॥ मेघ-
जलें पल्लव हे आर्द्र जाहले ॥ धुतले ज-
णु अधर तिचे अश्रु वाहुनी ॥ १ ॥ कुसु-
मकाल जाय म्हणुनि कुसुमशून्य ही ॥
अलंकाररहित दिसे तीच भामिनी ॥ २ ॥
श्रवणिं नये भ्रमरांचा शद्ब मधुर तो ॥
खिन्न मनें बैसलि कीं मौन सेवुनी ॥ ३ ॥

असो. पण ज्या अर्थी ही लता माझ्या प्रियेसारखी दिसते, त्या अर्थी हिला आलिंगन दिलं पाहिजे. (लतेस आलिं-गन देतो. तत्क्षणींच लतेची उर्वशी होते. तिचा स्पर्श होतांच) अहा! उर्वशीच्या आलिंगनानं जं सुख व्हायच,

तेंच मला या लतेच्या आलिंगनापासून होतं, हें काय बरं! ही उर्वशी तर नसेल! छे पण, विश्वास येत नाहीं. कारण-

दिंडी.

तिच्याविषयीं कल्पना जी करावी ॥
क्षण न जातां सर्व ती विफल व्हावी ॥
म्हणुनि सहसा नुघडीन नेत्र आतां ॥
असा राहिन मानोनि हीच कांता ॥ १ ॥

(हळूच डोळे उघडून) अरे! ही खरीच माझी प्रिया!

उर्व०—(अश्रु पुसून) महाराजांचा जयजयकार!

राजा—

साकी.

तव विरहाच्या गाढ तमीं मी बुडलों असतां कांते ॥
दैवें मजला लाभलीस जसि मृता चेतना येते ॥ १ ॥

उर्व०—महाराज, मला हें शरीर जरी नव्हतं, तरी अंतःकरणा मला आपला सर्व वृतांत समजला आहे.

राजा—जरी हें शरीर नव्हतं, तरी अंतःकरणानं समजल झणजे?

उर्व०—तें मी सांगतें, पण महाराज,

पद (बाला प्रति करो)

मनिं कोप नका ठेवूं हो महाराज ॥ वि-
नती ही या पदिं आज ॥ धृ० ॥ हे हाल
असे, केले मी कोपुनी ॥ तुम्हां सोडुनी ॥
गेले हो ॥ कांहिं नसुनि काज ॥ १ ॥



राजा—विनंति कसली! भलतच. उलट तुझ्या कल्याणदा

दर्शनानं मी प्रसन्न झालों आहे. पण प्रिये तूं मला सोडून, एकटी इतके दिवस कशी राहिलीस बर ?

उर्व०—ऐकावं महाराज. अखंडब्रह्मचर्यव्रत धरून,

पद. ( एकट्या मल्हाररायाॱ )

सुगंधमादनगिरि शेजारी ॥ अकलुष नामक
भागावरि ॥ स्वामी कार्तिक वसती करी ॥
करि एक नियम जी येथें ॥ येइल नारी ॥
त्या समयींच लतिका होइल ती निर्धारी ॥ १ ॥

अंजनी गीत

या नियमाचें गुरुशापानें ॥ स्मरण न झालें
या योगानें ॥ होते मी लतिकारूपानें ॥
आजवरी येथें ॥ १ ॥

राजा—प्रिये आतां सर्व जुळलं कारण—

पद ( आले वनमाळी रात्रीं )

होतां रतिखेद सखे, निजलों मी शयनिं
जरी ॥ होत असे दुःख तुला, गेलों मी
म्हणुनि दुरीं ॥ भीरु असुनि इतुकी तूं,
घोरवनीं आजवरी ॥ दीर्घविरह सोसुनिया,
राहिली नसतीस खरी ॥ १ ॥

असो. तूं सांगितलस तसंच झालं. या मण्याच्या योगानं तुझा पुनः संगम घडेल असं एका मुनींनीं सांगितल्यावरून मी हा मणि घेतला.

उर्वं०—अग बाई ! हाच कां तो मणि ! ( मस्तकावर धरिते. )

राजा—प्रिये, अशीच एक क्षणभर उभी रहा. अहा!

पद ( सुविहित जहालें )

तव शिरिं धरितां प्रिये सुमणि हा, कांति
मुखीं काशी रुचिर पसरली ॥ धृ० ॥
वदन दिसे जणु कमल कि ज्यावरि,
बालरवीची छविच विलसली ॥ १ ॥

उर्व०—माहाराज.

पद ( प्राणपति अजुन नयें )

जाउं चला नगरा ॥ आतां ॥ झाले बहु
दिन इकडे येऊन यास्तव परतुन ॥नाथा॥
॥ धृ० ॥ प्रजाजनांचा मजवरि सारा ॥
दोष असेल खरा ॥ १ ॥

राजा—चला. आपली आज्ञा होईल तसं वागायचं.
उर्व०—माहाराजांच्या मनांतून कसं जायचं आहे!
राजा—प्रीये,

पद [ कितीं तरी पहाटेची वेळ ]

नेइ मला नवमेघावरि बसवुनि राज-
मंदिरीं ॥ धृ० ॥ चपलाध्वज ज्यावरचा॥
झळके बहु तेजाचा॥चित्ररंग सुरधनुचा ॥
रम्य ज्यावरी ॥ १ ॥

( पडदा पडतो. )

अंक ४ था समाप्त.

---

# अंक ५ वा.

विदू०—( आनंदानें ) माझा मित्र नंदनवनादि रम्य अशा देवतांच्या वनांत उर्वशीसह नानाप्रकारचे विलास करून परत आला. सांप्रत तो प्रजाजनांची प्रीति व बहुमान संपादन करून राज्य करीत आहे खरोखर त्याला एक पुत्ररत्नावाचून कोणतीच न्यूनता नाहीं. आज कांहिं विशेष पर्वणी होती, ह्मणून तो राणीसहवर्तमान गंगा-यमुनेच्या संगमांत स्नान करण्या करितां गेला होता; तिथून नुकताच आपल्या पटगृहांत परत आला. आतां त्याच्या अंगाला कोणी सुवासिक चंदनाच्या उट्या लावीत असतील, कोणी त्याच्या गळ्यांत पुष्पमाळा घालीत असतील, कोणी त्याच्या अंगावर अलंकार चढवीत असतील. तर आपणही याच वेळेस तिकडे गेलों, ह्मणजे आपल्यालाही त्या गंधफुला पैकीं कांहिं भाग मिळेल.

( पडद्यांत )

अरेरे! उर्वशीबाईसाहेबांच्या मस्तकावर घालायचा मणि मी ताडपत्रावर ठेऊन नेत असतां, मांसखंडाच्या भ्रांतीनं, हा गृध्रपक्षि झडप मारून घेऊन चालला!

विदू०—( ऐकून ) अरेरे! हा तर मोठाच अनर्थ झाला! कारण तो संगमनीयमणि माझ्या मित्राच्या फार आवडीचा आहे. ह्मणूनच हें ऐकतांच माझा मित्र अंगावर पुरते अलंकार सुद्धां न घालतां, आसनावरून उठून इकडे आलो वाटते. चला तर तिकडेच—

( गोंधळलेल्या परिजनांसह राजा येतो. )

राजा— प्रबंध.

कोठें गृध्र तो चोर कोठें ॥ मृत्युमुखें धांव
जो घेउं थाटे ॥ धृ० ॥ प्रथम चौर्या करी ॥
रक्षकाच्या घरीं ॥ हेंचि त्याचें दिसे धाष्टर्य
मोठें ॥ १ ॥

किराती—ओ, ओ देखीये सरकार ! अक्रासमेसे चला है.

राजा—खरच, त्या मण्याचं हेमसूत्र मुखांत धरून पहा कसा वर्तुलाकार फिरवीत चालला आहे ! काय करावं वर आतां!

विदू०—( जवळ जाऊन ) करायचं काय ! अपराध्याला दया दाखवून उपयोगीं नाहीं, शासनच केलं पाहिजे.

राजा—बरोबर आहे. माझं धनुष्य ! धनुष्य आण. ( किराती जाते ) पण मित्रा तो पक्षी कुठें दिसत नाहीं !

विदू०—अरे, तो बेटा प्रेतभक्षक, या दक्षिणदिशेनं उडून गेला. तरी त्याला शासन झालंच पाहिजे.

( किराती धनुष्य घेऊन येते )

किरा०—महाराज ! ये धनुखवान्—

राजा—आतां याचा काय उपयोग! तो पक्षी बाणाच्या अवसाना बाहेर निघून गेला.

दिंडी.

धरुनि वदनीं पक्षि ज्या दूर नेई ॥
नभीं मणि तो शोभतो कसा पाही ॥
मेघखंडासंयुक्त निशीं जैसा ॥
दिसे मंगळ तो हाहि दिसे तैसा ॥ १ ॥

( कंचुकीस ) आर्या लातव्या!

कंचु०—आज्ञा महाराज !

राजा—नगररक्षकाकडे जाऊन, त्याला आमची अशी आज्ञा सांग, कीं संध्याकाळीं सर्व पक्षी झाडांवर जाऊन बसले, म्हणजे त्या चोरट्या पक्षाचा शोध करावा.

कंचु०—आज्ञे प्रमाणं सांगतों महाराज. ( जातो )

विदू०—मित्रा आतां खालीं बैस. तो चोर कुठें ही गेला, तरी तुझ्या शिक्षेतून सुटणार आहे कीं काय!

राजा—( बघून ) मित्रा,

साकी.

रत्न असे तें म्हणुनि न माझी प्रीति तयावरि जडली ॥
परि त्यायोगें प्रियरमणीची, पुनरपि संगति घडली ॥
कारण खेदाचें ॥ मित्रा हेंच होय साचें ॥ १ ॥

विदू०—हें तूं पूर्वींच मला सांगितलं होतस.

(इतक्यांत बाण व मणी घेऊन कंचुकी येतो)

कंचु०—महाराजांचा विजय असो ! सरकार,

पद [ उरला भेद न ]

नलगे खेद आतां कांहीं ॥ वार्ता सुखकर
परिसा ही ॥ धृ० ॥ जो बहु कोप तुम्हां
आला ॥ त्याचा खरशर जणु झाला ॥
गगनीं गाठुनि विहगाला ॥ त्याचा देह
भिन्न केला ॥ चाल ॥ अपराध्याला शा-
सन लागुनि घेउनि तो मणि ही ॥ आला
भूवरि लवलाही ॥ १ ॥

( सर्व विस्मित होतात. )

कंचु०— महाराज, हा मणी स्वच्छ धुऊन आणिला आहे. आज्ञा होईल त्याच्या स्वाधीन करीन.

राजा—किराती, तो अग्नींत घालून शुद्ध करून पेटींत ठेव. ( जोहारुम ह्मणून जाते ) लातव्या, तो बाण कुणाचारे!

कंचु०—महाराज, या बाणावर बाणमारणाराचं नांव आहे,परंतु माझ्या दृष्टीला तीं अक्षरं स्पष्ट दिसत नाहींत.

राजा—आण इकडे. मी वाचतों. ( कंचुकी बाण देतो. राजा नांव वाचून आनंदित होतो. )

कंचु०—महाराज, आज्ञा असेल तर मी आपल्या कामाला— ( आज्ञा मिळून जातो )

विदू०—मित्रा, विचार कसला चालला आहे!

राजा—हा बाण कुणाचा समजलास का ?

पद [ वायुनंदन रदन करकर ]

**उर्वशी ही ज्यास माता ॥ ऐलसुत जो**
**चाप धरिता ॥ आयु बालक शत्रुहंता ॥**
**असे खरतर बाण त्याचा हा ॥ १ ॥**

विदू०—( आनंदानें) वा: फार चांगल झालं ! तुझ्या वंशवृक्षाला हा अंकुरच फुटला.

राजा—पण हें झालं कसं ! कारण नैमिषारण्यांत यज्ञ चालत होता, त्यावेळीं मात्र कायती उर्वशी माझ्या जवळ नव्हती. त्यानंतर तिचा माझा वियोग कधींच झाला नाहीं. किंवा तिच्या गरोदर पणाचीं चिन्हं हीं मला दिसलीं नाहींत;

मग प्रसूतीची वार्ता कुठून बर! परंतु इतकं मात्र झालं होतं खरं, कीं—

पद ( पूर्वी अधरोष्टावरि तूष्या )

सखिच्या गौरकुचाचीं अग्रें, श्यामलसीं
तीं झालीं होतीं ॥ द्राक्ष फलासम पांडुरता
ही, पाहिलि मी त्या वदना वरती ॥ धृ० ॥
जात्या चंचल परि दिन कांहीं, दृष्टि तिची
बहु मंद दिसे ती ॥ चिन्हें इतुकीं आतां
मजला, पूर्णपणें कीं आठवताती ॥ १ ॥

विदू०—मग झालं तर. मानवीस्त्रियांचीं गरोदरपणाचीं सर्वच चिन्हं देवांगनांना होतात असं समजूं नकोस. कारण त्यांच्या प्रभावानं कांहीं कांहीं गुप्त असतात.

राजा—बर, तूं ह्मणतोस तसंच कां होईना. परंतु पुत्रजन्माचं वर्तमान माझ्यापासून गुप्त ठेवायच तिला काय कारण !

विदू०—अरं देवता त्या! त्यांचं रहस्य कुणाला कळणार !

( इतक्यांत कंचुकी येतो. )

कंचु०—महाराजांचा जयजयकार. महाराज च्यवन ऋषींच्या आश्रमांतून एक तापसी बाई एका कुमाराला घेऊन आल्या आहेत. त्यांच्या मनांतून महाराजांचं दर्शन घ्यायचं आहे. जशी आज्ञा—

राजा—जा, त्या दोघांनाही लवकर घेऊन ये.



( आज्ञा ह्मणून निघून जातो. व कांहीं वेळानें दोघांस घेऊन येतो. )

कंचु०—तापसी बाई, इकडून असं यायचं.

विदू०—( पाहून ) मित्रा ! या बाणावर ज्याचं नांव आहे तोच हा राजपुत्र ! तो तोंडवळा, तें तेज, ती वीरश्री ! अगदीं तुझी प्रतिमा दिसते पहा. ती गति सुद्धां केवळ—

राजा—ह्मणूनच वरं—

पद [ अशी सदा ही प्रीत ]

पाहुनि या कुमरा॥गंभीरा ॥ नयनीं आलें
नीर झरारा ॥ धृ० ॥ प्रसन्न झालें मानस
माझें ॥ हृदयीं वाढे स्नेह भरारा ॥ १ ॥
धीर न धरवे मजला आतां ॥ अंगीं सु-
टला कंप थरारा ॥ २ ॥ जाउनि वेगें आ-
लिंगावे ॥ उत्कंठा ही हो अनिवारा ॥ ३ ॥

कंचु०—तापसी बाई, इथे उभं रहावं. ( मुलासह उभी राहते.)

राजा—मातुश्री, मी वंदन करतों.

तापसी—हे महाभाग राजा, सोमवंशाचा विस्तार करणारा हो. ( मनांत ) काय चमत्कार आहे पहा ! न सांगतां न सवरतां, हा राजा आपला जनक, हें मुलाला आपोआप समजलं. बाळा जा पित्याला नमस्कार कर. ( मुलगा पित्यास वंदन करतो. राजा त्यास आयुष्मान् हो ! असा आशिर्वाद देतो. )

मुलगा—( मनांत)

पद [ दादरा, भैरवी ]



हे माझे तात, तसा पुत्र मी तयांचा॥परि-
सुनि हें जरि इतुका, हर्ष होत साचा ॥

॥ धृ० ॥ मग जननीजनकांनीं; अंकिं घेउनी ॥ वाढविलें बालक जे लाड लावुनी॥ प्रेमा त्यांविषयिं किती बालकां मनीं ॥ नकळे मज लवहि नसे अनुभव कीं त्याचा ॥ १ ॥

राजा—मातुश्री मनांत काय हेतु धरून येणं केलं ?

ताप०—ऐका. हा दीर्घायु बालक जन्मला, त्याच वेळीं उर्वशीनं कांहीं कारणानं ठेव ह्मणून माझ्या स्वाधीन केला. पुढें भगवान् च्यवन ऋषींनीं क्षत्रियकुमाराप्रमाणें याचा जातकर्मादि सर्व विधि केला, आणि सर्व विद्या झाल्यावर धनुर्वेदांतही याला प्रविण केला.

राजा—तर मग हा खरोखर सनाथ झाला !

ताप०—परंतु आज ऋषिकुमाराबरोबर पुष्पसमिधा आणायला गेला होता, तिथें याच्या हातून आश्रमधर्माविरुद्ध असं कांहीं कृत्य झालं.

राजा—तें कोणतं ?

ताप०—तिथें एका झाडावर तोंडांत मांसाचा तुकडा धरून एक गृध्रपक्षि बसला होता, त्याला यानं बाण मारून खालीं पाडलं.

राजा—बरं मग ?

ताप०—मग ही गोष्ट च्यवन ऋषींना समजली; तेव्हां त्यांनीं मला सांगितलं, कीं आतां ही ठेव ज्याची त्याला नेऊन दे. ह्मणून मी याला उर्वशीच्या स्वाधीन करायला आज इथं आलें.

राजा—तर मग या आसनावर बसावं. ( बसते ) लातव्या जा, उर्वशीला बोलावून आण. ( तो आज्ञा ह्मणून जातो. राजा पुत्राकडे पाहून ) बाळा ये !

पद [ असुनि तुझें मुख फार ]

आलिंगन मज देई कुमारा ॥ ये ये बा
सकुमारा ॥ धृ० ॥ हिमकर सुखवी कांत-
मण्याला ॥ तैसें या जनकास ॥ भेटुनि दे
आनंद, सुदैवें ॥ लाभ होय हा खास॥ १ ॥

तापo—जा बाळा. तुझा पिता काय सांगतो तें ऐक.

( मुलगा राजाजवळ जाऊन त्याचे पाय धरितो. )

राजा—( त्यास आलिंगन देऊन ) बाळा, हा ब्राह्मण तुझ्या पित्याचा प्रियमित्र आहे. तर त्यालाही नमस्कार कर. अरे जा भिऊं नकोस.

विदू०—अरे, तो कां भिईल ! त्यानं आश्रमांत माझ्या सारखीं माकडं पुष्कळ पाहिलीं असतील !

मुलगा—( हंसून ) काका मी नमस्कार करतों.

विदू०—तुझं कल्याण असो बर बाळा !

( इतक्यांत उर्वशी व कंचुकी येतात. )

कंचु०—बाई साहेब, असं इकडून यावं.

उर्व०—( मुलाकडे पहात ).

पद [ कहांके पथक कहा ]

चापधर कुमार हा बैसला कुणाचा ॥धृ०॥
धरुनिया कनकासनिं ॥ नाथ कसे

स्वकरांनीं ॥ केशभार सावरुनी॥ बांधिती
तयाचा ॥ १ ॥

(तापसीकडे पाहून) अग बाई, या सत्यवती बाई ! तर मग हा माझाच बाळ आयु ! बराच मोठा झाला आतां.

राजा— (उर्वशीला पाहून) बाळा—

साकी.

ही तव जननी उत्सुकतेनें तुज भेटाया आली ॥
पुत्रस्नेहें पान्हा फुटला, काचोळी ही भिजली ॥
बाळा जावोनी ॥ सुखवी तिजला भेटोनी ॥ १ ॥

ताप०— जा बाळा, आईला भेटजा. (उर्वशी तापसीस नमस्कार करिते.) मुली नवऱ्याच्या प्रीतींतली हो बर !

उर्व०— (आयूनें नमस्कार केल्यावर त्यास उचलून) बाळा वडिलांचा आज्ञा धारक हो. (राजास वंदन करिते)

राजा— पुत्रवती ये ये ! या सिंहासनावर बैस.

(उर्वशी अर्धसिंहासनावर वसते)

ताप० मुली, हा तुझा आयू बाळ विद्याभ्यास करून अंगावर कवच धारण करण्याजोगा मोठा झाला. तर आतां तुझ्या पतीच्या समक्ष ही तुझी ठेंव मी तुझ्या स्वाधीन करतें. येऊं तर आतां! आश्रमधर्मांत अंतर पडेल ह्मणून ह्मणते.

उर्व०— सासूबाई, पद. (दई मारे)

फार दिशीं भेटलात ॥ या म्हणूं कसें ॥ ध्रु॥
मी निरोप नाहीं दिला ॥ तरी व्यत्यय ध-
र्मीला ॥ या परंतु हें करा च ॥ होय भेट
निरन्तरें ॥

राजा– मातुःश्री, च्यवनऋषींना माझा प्रणिपात सांगावा.

ताप०– सांगेन बर. येतें हं बाळा.

मुल०– आजी, तूं खरंच जाणार कां? तर मला ही घेऊन चल. मी नाहीं इथें राहायचा.

राजा– बाळा, इतके दिवस त्या आश्रमांत होतास. आतां मोठा झालास ह्मणून गृहस्थाश्रमांत रहा. हें काय बरं? ये.

ताप०–बाळा वडीलसांगतात तें ऐक.

मुल०– बर तर. पण आजी–

पद ( त्रिताल. भैरवी )

मणिकंटक या नांवाचा ॥ माझा मोर मला
धाडुन दे ॥ फुटतां चि पिसारा त्याला ॥
माझा मोर मला धाडुन दे ॥ घेउनि अंकीं
शिर खाजवितां ॥ निद्रा घेई जो
आनंदें ॥ १ ॥

आजी, देशील ना धाडून.

ताप०–देईन बर बाळा. तुमचं सर्वांचं कल्याण असो. ( जाते )

राजा–सुंदरी !

पद [ किंनि कपटि असिसि तूं ]

सुतवंत जगीं बहु असती॥परि त्यां माजीं,
धन्य एक मी, या तव कुमरें खचित
सुदति ॥ धृ० ॥ इंद्राणीसुत, जयंत लाभें,
इंद्र जसा तो धन्य सुकृति ॥ १ ॥

( उर्वशी कांहीं आठवून रडूं लागते )

वीदू०–( पाहून ) अरे! पण आमची वहिनी एकाएकीं रडूं कां लागली एका!

राजा— ( घाबरून ) प्रिये हें काय?

पद [ गत वैभव झालों ऐसा ]

कां करिसि शोक आतां हा ॥ धृ० ॥पीन
कुचावरि बहु तेजाची ॥ लोळे एकसरी
मोत्यांची ॥ त्यावरि सखये जलबिंदूंची ॥
होय दुजी ही माळ पहा ॥ १ ॥

उर्व०—

पद [ सोच समज नादान ]

बाळ पुन्हा हा मजला भेटे ॥ या आनंदें
अंतर दाटे ॥ धृ० ॥ परि इंद्राच्या नामा-
सरसी ॥ नियम आठवे कांहीं मजसी ॥
दुःख मनाला त्याचें वाटे ॥ १ ॥

राजा— तो कोणता नियम!

उर्व०—पूर्वीं माझं मन आपल्यावर आसक्त झालं असं पाहून इंद्रानं मला आज्ञा केली कीं, जेव्हां माझा प्रिय मित्र तुझ्या पुत्राचं मुख पाहील तेव्हां तूं परत ये. या इंद्राच्या आज्ञे प्रमाणं आपला वियोग न व्हावा ह्मणून,

पद ( राग जोगी. दादरा )

च्यवनाश्रमीं या मुलास सत्यवती पाशीं ॥
जन्मतां चि ठेवियला वेद शिकायासी ॥
॥ धृ० ॥ साह्य तुम्हा द्यावयासि योग्य
जाणुनी ॥ आज तिनें मजसि दिला बाळ
आणुनी ॥ आतां सहवाससुखा मुकली
ही दासी ॥ १ ॥

राजा—हर हर !

पद [ कांते फार तुला ]

कैसी विधिनें निष्टुरता ही मजवरंती केली ॥ सौख्याची ती आशा माझी एका-एकीं लोपुनि गेली ॥ धृ० ॥ मेघजलानें जैसा तरुचा ॥ शांत चि होतां ताप रवीचा ॥ अवचित त्यावरि वीज पडावी॥ गति तैशी कीं माझी झाली ॥ १ ॥पाहुनि सुंदर पुत्र मुखाला ॥ झाला फार चि तोष मनाला ॥ इतुक्यांत चि ही तव विरहाची दुःसहवार्ता कानीं आली ॥ २ ॥

विदू०—काय पहा, सुखाची गोष्ट तीच दुःखाचं कारण झाली ! आतां मात्र आमचे महाराज वल्कलं परिधान करून तपोवनांत जातील असं वाटतं.

उर्व०—

पद [ सखये अनुसूये ]

दैवा हा माझा भोग चि आला ॥ देऊ मी दोष कुणाला ॥ १ ॥ आतां बालक हा मोठा झाला ॥ सर्व हि तो विद्या शिकला॥ ॥ २ ॥ अपुला कार्यभाग अवघा सरला ॥ जाणुनि हें सुरलोकाला ॥ ३ ॥ जाते टाकुनि ही येथें मजला ॥ वाटेल चि खचित तुम्हांला ॥ ४ ॥

राजा—छे छे ! असं झणूनकोस. कारण—

पद [ कालंगडा. दादरा ]

दोष तुझा कांहिं नसे॥ शांत सखे गे ॥धृ०॥
विरहा कारण परवशता ही ॥ तींत न
सौख्य वसे ॥ १ ॥ सोडुनि मजला स्वर्गी
नच जा ॥ हें मी सांगु कसें ॥ २ ॥

आणखी मी सुद्धां—

नृपपद बाळा देउनि सेविन ॥ कानन घोर
असें ॥ ३ ॥

ुल०—

अंजनी गीत.

मोठे मोठे भूपति राया ॥
योग्य राज्यभर शिरीं धराया ॥
लावुनि बालक हा त्या ठायां ॥
काय करिल सांगा ॥ १ ॥

जा—बाळा—

पद ( जरि असे धर्म मम साचा )

जरि गंध गजाचा छावा,तरि अन्य गजां-
ना भारी ॥ जरि भुजंगशिशु तो नांवा,
तरि असतो तीव्र विषारी ॥ नृपतनय तेवि
समजावा, योग्य भू धराया सारी॥चाल॥
जरि अल्प वयानें असला ॥ तरि ज्ञात्या
गुण जो ठसला॥ तो लपे कधिं न अंधारीं॥



हे मनीं सत्य अवधारीं ॥ १ ॥

लातव्या, मंत्रिमंडळास माझा निरोप सांग कीं, आयुच्या राज्याभिषेकाची तयारी करावी. ( आज्ञा ह्मणून कं-चुकी दुःखानेंच जातो )

( एकाएकीं सर्वांच्या दृष्टी चकित होतात )

राजा—हें आकाश निरभ्र असून विद्युल्लता कशी बर चमकूं लागली !

उर्व०—अग बाई! हे भगवान् नारदमुनी आले!

राजा—सखे खरच !

पद ( बहुनीप तरू फुलुनी )

मुनि नारद हे येति वरुनि भूतलावरी ॥ धृ ॥
कांचन रुचि–पिंगजटा शिरिं विराजती ॥
यज्ञसूत्र धवल जशी, चंद्रकोर ती ॥ मुक्ता-
फळ माळ गळां, शोभते किती ॥ वाटे,
कनकांकुर सुरतरु हा त्रिभुवनसंचारी ॥ १ ॥

अर्घ्योदक आण आधीं.

उर्व०—( आणून ) हें आणलं अर्घ्योदक महाराज.

नार०—( प्रवेश करून ) मध्यलोकपाळाचा विजय असो.

राजा—( अर्घ्योदक सोडून ) भगवन् ! मी प्रणिपात करितों.

उर्व०—मी नमस्कार करतें.

नार०—तुझां उभयतांचा वियोग नसो.

राजा–( मनांत) असं होईल तर मग काय! (उघड मुलास आ-लिंगून ) बाळा, नारदमुनींना नमस्कार कर.

मुल०—भगवन् हा उर्वशीपुत्र आयु प्रणाम करतो.



नार०—वत्सा दीर्घायु हो.

राजा—मुनिमहाराज, यां आसनावर बसावें.

नार०—(बसून) राजा,तुला एक इंद्राचा निरोप आहे. तो ऐक.

राजा—सांगावा महाराज कोणता तो. माझं लक्ष आहे.

नार०—संपूर्ण राज्यकारभार पुत्रावर टाकून, तूं वनांत जाण्याचा निश्चय केलास, हें वर्तमान देवेंद्राला स्वप्रभावानं कळलं; ह्मणून त्यानं तुला असं सांगितलं आहे कीं—

साकी.

कांहीं कालें असुरसुरांचें होईल रण त्या
कालीं ॥ पुरूरवा नृप जिंकिल असुरां, ऐसीं
वाणी वदली ॥ त्रिकालविन्मुनिची ॥
कथिली तुजला ती साची ॥

या करितां तूं शस्त्रत्याग करूं नकोस. ही उर्वशी तुझं जीवमान आहे तोंपर्यंत तुझी सहधर्मचारिणी होऊन राहील.

उर्व०—( मनांत ) या आशिर्वादानं माझ्या मनांतलं शल्यच काढलं तर !

राजा—मुनिवर्य, देवेंद्राचा दासच आहे मी !

नार०—ठीकच आहे ! कारण—

दिंडी.

करी मघवा तव कार्य भूमिपाला ॥
तूंहि करिसी साह्य त्या वासवाला ॥
देइ अग्निस रवि तेज अस्तमानीं ॥
प्रभातीं तो सूर्यास दे फिरोनीं ॥ १ ॥

( आकाशाकडे पाहून ) रंभे, प्रत्यक्ष इंद्रान आयुला राज्याभिषेक करण्याचा सर्व सामग्री तयार केली आहे, ती घेऊन ये.

रंभा–( प्रवेश करून ) भगवन् ! ही आणली.

नार०–( मुलाच्या मस्तकावर कलश ओतून ) रंभे, बाकीचा सर्व विधि तूं कर.

रंभा ( सर्व करून ) बाळा नारदमुनींना नमस्कार कर. ( तो तसें करतो. त्यास नारद ' कल्याण होवो ' असा आशिर्वाद देतात. ) बाळा आतां पित्याला आणि आईला नमस्कार कर. ( तो तसें करतो. राजा त्यास " कुलधुरंधर हो "असा आशिर्वाद देतो. व उर्वशी 'पित्याचा लाडका हो ' असा आशिर्वाद देऊन त्यास रंभेला नमस्कार कर असें सांगते. तो तसें करतो )

नार०–रंभे, वत्साला सिंहासनावर बशीव. ( ती बसविते. )

( पडद्यांत )

पहिला वैतालिक–युवराजांचा जयजयकार.

प्रबंध.

ब्रम्हसुत अत्रिमुनि ॥ अत्रिसुत चंद्र तो ॥
चंद्रसुत बुध, तया ॥ नाथ अमुचे ॥
एकमेकां परी ॥ ते जसे, तूंहि हो ॥
जनकसम, घेउनी ॥ सुगुण त्याचे ॥
दुजीं सर्व आशिर्वचें राजकुलिं या ॥
असति थार्थीच तीं भूपतनया ॥ १ ॥

दुसरा–युवराजांचा जयजयकार.

जान्हवी ती तशी ॥ दिसतसे सागरीं ॥

राज्यलक्ष्मी तशी ॥ तात तनयीं ॥

भागिली, परि तुला ॥ अधिक ही शोभते ॥
असति तूं अचलधी परम विनयी ॥
जसा पर्वतीं हिमनगश्रेष्ठ, तव जनकही ॥
धीरलोकीं तसा श्रेष्ठ पाही ॥ २ ॥

रंभा—सखे, पुत्राला युवराजपद मिळालं, आणि तुला पतीच्या चिरसमागमाचा लाभ झाला, या दोन्ही गोष्टी चांगल्याच झाल्या.

उर्व०—हा आनंद दोघींना ही सारखाच आहे. ( मुलास हातीं धरून ) बाळा, जेष्ठ मातेला नमस्कार कर जा.

राजा—थांब जरा. सर्वच मिळून जाऊं तिकडे.

नार०—राजा,

साकी.

सेनानायकपदीं स्थापिला महासेन इंद्रानें ॥
स्मरलें मज तें, युवराजपदीं याच्या अभिषेकानें ॥
शोभा त्या कालीं ॥ तैसी आज पहा दिसली ॥ १॥

राजा—आपला अनुग्रह झाल्यावर काय होणार नाहीं!

नार०—राजा, इंद्रानं तुझं आणखी काय प्रिय करावं ?

राजा—महाराज, आणखी काय प्रिय करायचं! परंतु—

पद [ हा उत्सुक तव संगमा ]

तो प्रसन्न जरि मजवरी ॥ हाचि वर देवो ॥
विद्या श्रीचा एका घरीं ॥ वास तो होवो ॥
त्या दोघींचें यावरी ॥ वैर तें जावो ॥
लाभो सौख्य सदा सज्जनां ॥त्यांचा सफल

असो कामना ॥ राहो सत्कर्मी वासना ॥
दुरित लय पावो ॥ १ ॥

सर्व जातात

अंक ५ वा समाप्त.



# प्रार्थना

## पद

( तन धि ओम् तनन या चा० )

चिन्मया, सकलहृदया ॥ सदया, दे, या, गोविंदा,
वर वरदा, कलिमलविलया ॥ धृ० ॥

विषयपिपासापीडितसा ॥ निःसारा, संसारा,
मृगनीरा-सम, भुललों, मी, परि फसलों, विस्मरलों,
तव भजनीं, लागाया ॥ १ ॥

कामधनाशा, ही विवशा॥ मन्नाशा, सरसावे,
तत्पाशीं, सांपडलों, ये, धावोनी, यांतोनी,
सोडवुनी, मज ध्याया ॥ २ ॥

सौख्य सदां तव ज्या ठायीं ॥ तापाचा, पापाचा,
लेश नसे, शांति वसे, ने, येवोनी, त्या स्थानीं,
सुखभुवनीं, शिवराया ॥ ३ ॥